# नवभारत



वर्ष ९ वें ] नोव्हेंबर १९५५ [ अंक २ रा



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# ' नवभारत ' निधि

## -- विनंति --

' नवभारत ' मासिकाप्रीत्यर्थ येत्या डिसेंबर १९५५ अखेरपर्यंत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां एक विनंतिपत्रक 'नवभारता'च्या गेल्या जानेवारी व फेब्रुवारी १९५५ च्या अंकांतून प्रसिद्ध झालेंच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून, सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, श्री. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. बा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिन्दु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

' नवभारत ' निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, शक्य तों प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें अशी विनंति वर उल्लेखिलेल्या विनंतिपत्रकांत केली आहे. १०० रु. देणगी देणारांस ' नवभारत ' मासिक दहा वर्षे मिळत जाईल. या विनंतिपत्रकाला मान देऊन सर्वांनीं ' नवभारत ' निधीस साहाय्य करावें अशी आमची सर्वांना प्रार्थना आहे.

' नवभारत ' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

' नवभारता'च्या गेल्या म्हणजे ऑक्टोबर १९५५ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा खालीं दिल्या आहेत :

| | रु. |
|---|---|
| ' क्ष ' ( पहिला हप्ता ) | २० |
| मागील महिनाअखेर जमा झालेली रक्कम | ४३९३ |
| एकूण | ४४१३ |

' नवभारत ' निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर (खजिनदार ), श्री. कृ. ना. फडके ( कार्यवाह ), श्री. मा. प. मंगुडकर ( कार्यवाह ).

' नवभारत ' निधि-समितीचें कार्यालय c/o ' नवभारत ' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या "खजिनदार, ' नवभारत ' निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ " या पत्त्यावर पाठवाव्या अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** (अध्यक्ष)

२५।१०।१९५५ **कृ. ना. फडके** } कार्यवाह
पुणें ४ **मा. प. मंगुडकर** }

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष नववें | अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर १९५५

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( ज. सातारा ).






# 'नवभारत' मासिक, नोव्हेंबर १९५५

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे-- का. सं. ]

**श्री. गं. दे. खानोलकर** ( मुंबई ) — 'माधव ज्युलिअन', 'प्रो. विष्णु गोविन्द विजापूरकर', 'श्रीपाद कृष्ण कोल्हटकर' इत्यादि चरित्रांचे लेखक. यांच्या 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' या पंचखंडात्मक ग्रंथांपैकीं तीन खंड प्रसिद्ध झाले आहेत.

**श्री. सी. श्री. उपाध्ये** ( वालावल, जि. रत्नागिरी ) — चित्रकलाध्यापक.

**प्रा. आर्. एल्. निगम** -- डेहराडून येथील डी. ए. व्ही. कॉलेजांत इंग्रजीचे प्राध्यापक.

**प्रा. गो. के. भट** — अहमदाबाद येथील गुजरात कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक. 'प्रणय', 'गृहदाह', 'Preface to Mrichhakatika' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**आचार्य स. ज. भागवत** ( पुणें ) — शिक्षणशास्त्रज्ञ, गारगोटी ( कोल्हापूर ) येथील 'मौनी विद्यापीठा'चे कुलगुरु. 'आंतरभारती'चे संचालक. 'नवभारता'चे एक संपादक. 'जीवन आणि साहित्य', 'जीवनशिक्षण' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. पु. ह. ऊर्फ रावसाहेब पटवर्धन** -- 'साधना' साप्ताहिकाचे एक संपादक.

**प्रा. दे. अ. दाभोलकर** -- मुंबई येथील डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या चॉंबे कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**सौ. कमलिनी दामले** एम्. ए. बी. टी. -- पुणें येथील नौ. वाडिआ कॉलेजमध्यें टी. डी. विभागांतील प्राध्यापिका.

**श्री. शंकरराव देव** ( आश्रम, सासवड ) -- अखिलभारतीयकॉंग्रेसचे एक माजी सरचिटणीस. भूदान-कार्यकर्ते. 'नवभारत' मासिकाचे संचालक. 'उपनिषत्सार', 'भगवान् बुद्धासाठी' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. स. आ. सप्रे** ( मुंबई ) -- 'इंडस्ट्रिअल ॲड्मिनिस्ट्रेशन' या विषयाचे व्यासंगी. वाङ्मयटीकाशास्त्र व तत्त्वज्ञान या विषयांचे अभ्यासु.

**प्रा. सुरेश डोळके** -- नागपूर महाविद्यालयांत मराठीचे प्राध्यापक.

**श्री. वसंत नारगोलकर** एम्. ए. एल्एल्बी.—( कैनाड, जि. ठाणें ) आदिवासी कार्याला वाहून घेतलेले कार्यकर्ते. वारली जीवनावर 'जंगलचे राजे' हें यांचें श्री. कुसुम नारगोलकर यांच्या सहकार्यानें लिहिलेलें पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे.

**प्रा. चन्द्रशेखर कपाले** -- गुलबर्गा येथील 'आर्ट्स ॲन्ड सायन्स कॉलेज'मध्यें मराठीचे प्राध्यापक.

**प्रा. न. क. कुलकर्णी** -- सांगली येथील विलिंग्डन कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

---

अनुक्रमणिका






श्री. गं. दे. खानोलकर

# बंगाली भाषेंत तुकाराम

बंगाली भाषेचे भोक्ते असे माझे एक वृद्ध स्नेही आहेत; त्यांची सत्तरी उलटली आहे, पण ज्ञान-जिज्ञासा आणि वाचनाची आवड अनिवार आहे. परमार्थप्रवण अशी त्यांची मनोवृत्ति असल्यामुळें त्यांचें तद्विषयक वाचन विशेष असतें. श्रीरामकृष्ण-विवेकानंदांचे ते एक निष्ठावन्त भक्त असल्यामुळें, आराध्य दैवतें वाटणाऱ्या या विभूतींचें त्यांच्या माय-भाषेंतून प्रसिद्ध झालेलें वाङ्मय वाचावें, या हेतूनें कोश-व्याकरणादि ग्रंथांना गुरू करून ते स्वावलंबनानें बंगाली भाषा शिकले. समान श्रद्धास्थानामुळें त्यांचा माझा जेव्हां प्रथम परिचय घडून आला, तेव्हां बंगवाङ्मयासंबंधीं बोलतां बोलतां ते सहज म्हणाले : "बंगालींत तुकाराम-महाराजांचें एक सुंदर चरित्र लिहिलं गेलं आहे. वाचलंच असेल तुम्हीं." "मी पहिल्यांदाच ऐकतों आहे हें तुमच्या तोंडून !" मी उत्तरलों. "हें घ्या. याचा लेखक बंगाली वाङ्मयांतील जुन्या पिढींतील माननीयांपैकीं एक म्हणून गणला जातो, असें आपले स्वामी ××× सांगत असत. छान लिहिलं आहे चरित्र. मूळ मराठी ग्रंथ अभ्यासून लिहिलं आहे, हें विशेष. महीपतीकृत तुकारामचरित्र बारकाईनें वाचलेलं दिसतं या गृहस्थानं."

मी मोठ्या कुतूहलानें तें पुस्तक त्यांजकडून घेतलें आणि घरीं येऊन एकाद्या अधाशाप्रमाणें तें वाचून काढलें. मराठींत जीं तुकारामचरित्रें आहेत त्याहून नवीन अशी कांहीं माहिती त्यांत नव्हती. पण लेखकानें तुकोबांच्या अभंगांचा जो छंदोबद्ध अनुवाद केला होता तो मला मोठा कौतुकाचा वाटला. तुकोबांच्या अभंगांतील आशय व भाव जशाचा तसा बंगाली पद्यांत–स्वैरपणें का होईना – उतरलेला पाहून अनुवादकाची पाठ थोपटावीशी वाटली. चरित्राचा, विशेषतः त्यांतील अनुवादित अभंगांचा, मराठी बांधवांस परिचय करून द्यावा असें त्याचवेळीं मनांत आलें. पण पुढें किंचित् आळसामुळें, किंचित् अन्य व्यवधानांमुळें तो विचार तसाच राहून गेला. परवां, श्री. अ. का. प्रियोळकर यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या '**मराठी संशोधन – पत्रिका**' या त्रैमासिकाचा (एप्रिल १९५५) अंक सहज चाळीत असतां, त्यांतील 'मुद्रित तुकारामवाङ्मय' हें प्रकरण दृष्टीस पडलें. त्याच्या प्रास्ताविक मजकुरांत, "श्रीयुत सत्येन्द्रनाथ टागोर यांनीं तुकारामाच्या कांहीं अभंगांचें बंगालींत भाषान्तर केलें होतें, असें कळतें. त्याचा शोध घेण्यास अवसर सांपडलेला नाहीं." असे उद्गार संपादकांनीं काढलेले आढळले. ते वाचून मला या बंगाली चरित्राची पुन्हां आठवण झाली. आज, माझ्या त्या वृद्ध स्नेह्यांकडून तें चरित्र पुन्हां मागून घेऊन त्याचा – '**तुकाराम चरिता**'चा – परिचय मराठी वाचकांना करून देत आहें.

'**तुकारामचरित**' या पुस्तकाचे लेखक कवि-भूषण श्रीयोगेन्द्रनाथ बसु हे एक उच्च दर्जाचे कवि, चरित्रकार व निबंधलेखक होते. 'पृथ्वीराज महाकाव्य', मायकेल मधुसूदन दत्तेर जीवनचरित', 'कठोपनिषत् कवितानुवाद', 'सरल कृत्तिवास-रामायण', सरल काशीरामदास महाभारत', 'पतिव्रता', 'सीताचरित' वगैरे ग्रंथ यांनीं रचिले आहेत.

योगीन्द्रनाथांना तुकाराममहाराजांचा पहिला परिचय कविसम्राट् रवीन्द्रनाथ ठाकूर यांचे एक वडील बंधु सत्येन्द्रनाथ ठाकूर यांच्या, ठाकूर कुटुंबानें चालविलेल्या 'भारती' या बंगाली मासिकांत प्रसिद्ध झालेल्या चरित्रात्मक निबंधामुळें व त्यानंतरच्या त्यांच्या 'बॉम्बाईचित्र' या पुस्तकामुळें झाला. तो लेख वाचून त्यांना तुकाराममहाराजांचें पारमार्थिक जीवन आणि त्यांची कविता यांबद्दल विलक्षण जिज्ञासा उत्पन्न झाली. सन्त तुकारामांची मराठी भाषा आपण शिकावी आणि त्यांचा अंतर्बाह्य साक्षात् परिचय करून घ्यावा अशी त्यांना सारखी तळमळ लागून राहिली. सुदैवानें








त्यांच्या जुन्या छात्रगणापैकीं[1] एक छात्र महाराष्ट्रीय होता, त्याची त्यांना आठवण होऊन, त्याचें या कामीं साहाय्य घेण्याचें त्यानीं ठरविलें. हे छात्र म्हणजे बंगालींतील विख्यात् महाराष्ट्रीय लेखक सखाराम गणेश देऊसकर हे होत. प्रौढप्रताप शिवाजी महाराज व त्यांचा महाराष्ट्र यांचें सम्यक् दर्शन वंगसमाजाला आपल्या लेखणीनें यांनींच समर्थपणें पहिल्यानें करून दिलें. बंगाली भाषेची– आणि अप्रत्यक्षपणें महाराष्ट्राचीहि— यांनीं केलेली सेवा थोर व चिरस्मरणीय आहे. बंगाली वाङ्मयसेवकांत या मराठा लेखकाला मोठें मानाचें स्थान देण्यांत येतें. योगीन्द्रनाथबाबु या आपल्या छात्राकडे मराठी भाषा शिकले व त्याच्याच साहाय्यानें तुकाराममहाराजांचे अभंग व त्यांजविषयींचें मराठींतील सर्व उपलब्ध वाङ्मय त्यांनीं काळजीपूर्वक अभ्यासिलें. या अभ्यासाचें फळ म्हणजे 'दासी' या, आतां अस्तंगत झालेल्या, मासिकांत आधीं क्रमशः प्रसिद्ध झालेलें, व पुढें पुस्तकरूपानें मुद्रित झालेलें 'तुकारामचरित' होय. हें चरित्र लिहीत असतां योगीन्द्रनाथबाबूंची फार इच्छा होती कीं, आपण तुकाराममहाराजांची जन्मभूमि देहु, त्याच्या बाजूनें वाहणारी पवित्रसलिला इंद्रायणी, त्यांची इष्टदेवता पंढरपूरची विठाई माऊली हीं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहावीं, त्या भागवती वातावरणांत कांहीं काळ रमावें, कांहीं नवी अनुभूति संपादावी; आणि मगच संस्कारित असें विस्तृत 'तुकारामचरित' लिहावें, त्यांच्या निवडक अभंगांचा पद्यात्मक अनुवाद करावा. पण अनेक अडचणींमुळें योगेन्द्रनाथबाबूंना तें शक्य झालें नाहीं. तेव्हां त्यानीं तुकाराममहाराजांच्या जीवनकथेला पोषक अशा अभंगांचाच तेवढा अनुवाद करून व जें मराठी साहित्य हाताशीं आलें त्याचा यथोचित उपयोग करून, 'तुकारामचरित' कांहीं वर्षांनीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें. या पुस्तकाच्या दोन आवृत्त्या निघाल्या. द्वितीयावृत्ति वंगाब्द १३२४ मध्यें (इ. स. १९१७) प्रसिद्ध झाली. प्रथमावृत्ति केव्हां निघाली याचा उल्लेख प्रस्तावनेंत नसल्यामुळें तें कळण्यास मार्ग नाहीं. क्राउन षोडशपत्री सांच्याच्या १२६ पृष्ठांचें हें पुस्तक आहे. सुललित भाषेंत सहानुभूतिपूर्ण अंतःकरणानें तें लिहिलें आहे. यांत तुकाराममहाराजांचे जे अनुवादित अभंग दिलेले आहेत त्यांपैकीं तीन सत्येन्द्रनाथ ठाकूर यांनीं अनुवादिलेले असून, बाकीच्यांचा अनुवाद स्वतः योगेन्द्रनाथबाबूंनीं केलेला आहे.

'तुकारामचरितां'तील कांहीं अनुवादित अभंग – मूळासह – वानगीदाखल येथें देतों :

अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ ॥  
त्याचे गळां माळ असो नसो ॥ १ ॥  
आत्मा अनुभवीं चोखळील्या वाटा ॥  
त्याचे माथां जटा असो नसो ॥ २ ॥  
परद्रव्या अंध निंदेसी जो मूका ॥  
तोचि संत देखा तुका म्हणे ॥ ३ ॥

" बचन मधुर जाँर, निर्मल हृदय,  
कण्ठदेशे जदि ताँर माल्य नाहि रय ।  
आत्मारामे अन्तरेते सदा रति जाँर,  
शिरे ताँर जदि नाहि रहे जटाभार ॥  
अन्ध जिनि परद्रव्य करिते दर्शन,  
मूक जिनि परनिन्दा करिते रटन ।  
तुका बोले, एइ सार कहिनु निश्चय,  
तिनिइ प्रकृत साधु, नाहिक संशय ॥ "

* * *

नावडे जें चित्ता । तेंचि होसी पुरविता ॥ १ ॥  
कां रे पुरविली पाठी । माझी केली जीवें साटी ॥२॥  
न करावा संग । वाटे दुरावावें जग ॥ ३ ॥  
सेवावा एकान्त । वाटे न बोलावी मात ॥ ४ ॥  
जन धन तन । वाटे लेखावें वमन ॥ ५ ॥  
तुका म्हणे सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ ६ ॥

" चाहिना जे सब नाथ ! केनो गो दितेछो मोरे ?  
निरन्तर केनो हेनो फेलिछो संकट घोरे ?  
संसार हइते सदा दूरे रहिबारे चाइ;  
मानवेर साथ आर करिते वासना नाइ ॥  
विजन विपिन माझे सतत हरषे रवो;  
जगतेर कार (ओ) सने कखनओ ना कथा कवो ॥  
एइमात्र चाहि, प्रभो ! जेनो देह, धन, जन  
वमन सदृश पारि करिबारे दरशन ॥  
तुका बोले, पदे तव एइ निवेदन करि,  
सकलइ लोमारइ इच्छा, हे पण्ढरीपति हरि ॥ "

* * *

जळे माझी काया लागला वोणवा ।  
धांव रे केशवा मायबापा ॥ १ ॥  
पेटली सकळ कान्ति रोमावळी ।

[1] योगीन्द्रनाथबाबू हे एक शिक्षक होते.










नावरे हे होळी दहन जालें ॥ २ ॥
फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे ।
पाहतोसी काय हृदय माझें ॥ ३॥
घेऊनी जीवन धांवें लवलाहीं ।
कवणाचें कांहीं न चले येथें ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी तूं होसी जननी ।
आणीक निर्वाणीं कोण राखे ॥ ५ ॥

" प्रचण्ड अनले देह करिछे दहन;
ए समय कोथा हरि ! कर गो रक्षण ।
जनक, जननी प्रभू तुमिइ आमार;
एशो तबे कृपा करि एशो एक बार ॥
आपाद मस्तक हेर दहिछे अनले;
सहिबारे नाहि पारि भासि आँखि जले ।
भेंगे बुझि गेलो बूक, सहेना जे आर,
दाडाइया कि देखिछो, ओ हे कृपाधार ॥
शान्तिर सलिल लये एशो त्वरा करि,
तोमा विना केबा मोरे उद्धारिबे हरि !
तुका बोले तुमि तो गो जननी आमार;
तोमा विना केबा मोरे करिबे निस्तार ॥

* * *

योगीन्द्रनाथबाबूंनीं सत्येन्द्रनाथ ठाकूर यांच्या कांहीं अनुवादित अभंगांतून जे तीन अभंग प्रस्तुत पुस्तकांत घेतले आहेत ते तिन्ही येथें देतों. :

गोणी आली घरा । दाणे खाऊं नेदी पोरा ॥ १ ॥
भरी लोकांची पांटोरी । मेला चोरटा खाणोरी ॥ २ ॥
खवळली पिसी । हाता झोंबे जैसी लांसी ॥ ३ ॥
तुका म्हणे खोटा । रांडे संचिताचा सांटा ॥ ४ ॥

" घरे दुटा अन्न एले
छेलेदेर देबो कोथा खेते ।
हतभागा ता देबे ना,
सकलि परेरे चान दिते !
तुका बोले अतिथिरे
जखनि गो दिते जाइ भात,
राक्षसीर मतो एशे
हतभागी धरे मोर हात "

* * *

आतां पोरा काय खासी । गोहो जाला देवलसी ॥ १ ॥
डोचकें तिंबी घातल्या माळा । उदमाचा सांडी चाळा ॥ २ ॥
आपल्या पोटा केली थार । आमचा नाहीं येसपार ॥३॥
हातीं टाळ तोंड वासी । गाय देउळीं देवापासीं ॥४॥
आतां आम्ही करूं काय । न वसे घरीं राना जाय ॥५॥
तुका म्हणे आतां धीरी । आझुनी नाहीं जालें तरी ॥६॥

" खाबार कोथाय पाबि, बाछा,
बाप तोर थाकेन मन्दिरे—
माथाय जडान तिनि माला,
घरे आर आशेन् ना फिरे ।
निजेर होलेइ होलो खावा
आमादेर देखेन ना चेये !
करताल बाजिये तिनि शुधु
मन्दिरे बेडान गेये गेये ।
कि करिबो बोल् देखि, बाछा !
किछुइ तो भेबे नाहि पाइ ।
घरे ना बसेन एक रति,
चले जान अरण्ये सदाइ ।
तुका बोले धैर्य धर मने
एखनो सकल फुराय नाइ... । "

* * *

कोण घरा येतें आमुच्या कशाला ।
काय ज्याचा त्याला नाहीं धंदा ॥ १ ॥
देवासाठीं झालें ब्रह्माण्ड सोइरें ।
कोंवळ्या उत्तरें काय वेचे ॥ २ ॥
मागें पाचारितां नव्हे आराणूक ।
ऐसें घेती लोक प्रीतीसाठीं ॥ ३ ॥
तुका म्हणे रांडे नावडे भूषण ।
कांतिलेंसें श्वान लागे पाठी ॥ ४ ॥

" हेथा केनो आशे लोकगुला,
तादेर कि काज नाइ हाते ?
तुका कहे ईश्वरेर तरे,
ब्रह्माण्ड मिलेछे मोर साथे ।
भालो मुखे दु चारिटा कथा,
ना जानि, ताहे कि क्षति आछे !
कोथाओ जाय ना जारा कभू
भालोबेसे बसे मोर काछे ।
एओ से बाले ना भालो, हाय !
भाग्य किबा आछे एर बाडा,
सकल लोकेर पाछे पाछे
कुकुरेर मत करे ताडा ।

सत्येन्द्रनाथ ठाकूर हे इंडियन सिव्हिल सर्व्हिसमध्यें असून त्यांचा नोकरीचा बराचसा काळ अहमदा-










बाद, मुंबई, पुणें, कारवार या भागांत गेला. या काळांतील वास्तव्यांत मुंबई-पुण्यांतील प्रार्थनासमाजपंथीयांशीं, ते स्वतः एकेश्वरी मताचे असल्यामुळें, त्यांचा विशेष परिचय घडून आला असावा. प्रार्थनासमाजपंथीयांत तुकाराममहाराजांबद्दल विशेष आदर आढळतो. या मंडळीचीं बहुतेक प्रवचनें महाराजांच्या अभंगांवरच आधारलेलीं असावयाचीं. प्रार्थनासमाजियांशीं आलेल्या संबंधामुळें सत्येन्द्रनाथ ठाकूर यांचें लक्ष तुकोबांकडे वळलें असावें. मराठी भाषेचा साक्षेपानें अभ्यास करून त्यांनीं तुकारामचरित्रावर निबंध तर लिहिलाच, पण त्यांच्या अनेक निवडक अभंगांचा बंगालींत अनुवाद करून महाराजांच्या शिकवणीचा व व्यक्तिमत्त्वाचा बंगाली समाजाला उत्तम प्रकारें परिचय करून दिला. सत्येन्द्रनाथांनीं करून दिलेला परिचय योगीन्द्रनाथ बसु यानीं अधिक वाढवून दृढ केला. योगीन्द्रनाथांनीं चरित्राचे शेवटीं म्हटलें आहे : " वैराग्य, विनय व भगवत्प्रेम हे त्रिगुण हाच तुकारामजीवनाचा सारांश. शास्त्रज्ञान, तर्कशक्ति किंवा पांडित्य यांपैकीं त्यांचेजवळ कांहींहि नव्हतें. असें असतांहि त्यांचें भाषण कानावर पडतांच किंवा त्यांची कथा ऐकत असतां विषयी विषयवासनेपासून निवृत्त होई, ज्ञानाभिमानी ज्ञानगर्वापासून दूर जाई, तार्किकाचें शुष्क हृदय भक्ति-प्रेमाच्या अमृतप्रवाहानें सिंचित होई. एका भक्तीचे बळावर त्यांनीं लोकहृदयें काबीज केलीं होतीं. संप्रदायस्थापना करणाऱ्या जगांतील धर्मसंस्थापकांत त्यांची गणना करतां येणार नाहीं. ते तसे धर्मसंस्थापक नसल्यामुळें भारताबाहेर त्यांचें नांव फारसें कोणाला माहीत नाहीं. परंतु त्यांच्यांतील भक्ति, निर्भयशीलता, जीवदया, वैराग्य, विनय प्रभृति गुण पृथ्वीवर होऊन गेलेल्या कोणत्याहि थोर-साधु महात्म्याच्या गुणांइतकेच स्पृहणीय आहेत. तुकाराममहाराजांचें अस्तित्व धर्मप्रचारक म्हणून जरी पृथक्पणें दिसलें नाहीं, तरी भारतांतील सर्व श्रेष्ठ धर्मप्रचारकांच्या अस्तित्वांतच तें सामावून राहिलेलें आहे व पुढेंहि राहील. त्यांची वैचारिक क्रियाशक्ती लुप्त झालेली नाहीं; ती अखण्ड चालू राहणार. हिंदुत्वरक्षण ही गोष्ट जोंवर हिंदूंना गौरवास्पद व अगत्याची आहे असें वाटत राहील, तोंवर खऱ्या हिंदुधर्माची जाणीव देणाऱ्या तुकाराममहाराजांचा गौरवच होत राहील, नव्हे तसा तो होत राहिलाच पाहिजे. प्रत्येक हिंदुसंतान तुकाराममहाराजांबद्दल कृतज्ञताच बाळगील. "

महाराष्ट्राच्या या थोर व बहुजनप्रिय संताचा वंगबंधूंना उत्तम प्रकारें परिचय करून दिल्याबद्दल योगेन्द्रनाथ बसु, त्याचप्रमाणें सत्येन्द्रनाथ ठाकूर यांजबद्दल महाराष्ट्रियांना केव्हांहि कृतज्ञताच वाटेल.

---

## सर केव्हां शिरशिरे

सर केव्हां शिरशिरे  
गार वारा भिरभिरे  
उरीं कुठें बावरल्या  
कांहीं न्यारेंच शहारे

आज दिशा नाहतात  
रिम्झिम् त्या तालांत  
क्षितिजाच्या रिंगणांत  
दर्या भरे फेसाळत

आज उन्हाचीं पाउलें  
पुसटुनी साफ गेलीं  
रानी साळुंकीची शीळ  
परांआड चिंब झाली

कळी लाल गुलाबाची  
ओंझळींत मोती वेई  
थेंब कुठें पागोळीचा  
तावदान चाखूं येई

वेल झुले डोहाळ्यानें  
फूल रुजे केसरांत  
दूध भरूं आलें आतां  
गोरट्या उरांत

— सी. श्री. उपाध्ये








प्रा. आर्. एल्. निगम. अनु. – श्री. भा. वा. भिडे

# *'तत्त्वज्ञ राज्यकर्त्यां'ची आवश्यकता

मनुष्य बाल्यावस्थेंत असतां तत्त्वज्ञ राजाची कल्पना प्लेटो या ग्रीक तत्त्ववेत्त्यास सुचली. प्लेटोच्या विचारांत दडलेले कित्येक अर्थ स्वीकारार्ह नाहींत, हें खरें. तथापि त्याच्या चिंतनाचे प्रमुख विषय हे शहाणपणाचे, निकोप व आदरणीय असेच आहेत.

ते प्रमुख विषय साक्रेटिसाच्या सारखेच–म्हणजे सद्गुण, शहाणपणा व ज्ञान हे होत. प्लेटोच्या मतें ज्ञान व सद्गुण हे समानार्थी होत, तर बुद्धि हा मानवामधील अत्यंत, महत्त्वाचा घटक होय. प्लेटोचे विचार नीट पारखून पाहिल्यास ज्यांत कांहीं मार्गदर्शक खुणा सांपडण्याचा संभव आहे, अशा विचारांपैकी एक 'तत्त्वज्ञ राजा' हा विचार आहे. मानवी प्रश्नांचा संपूर्ण पल्ला ज्यांच्या मनांत सामावलेला असावयाचा त्या श्री. मानवेंद्रनाथ रॉय यांच्या राजकीय विचारांत प्लेटोच्या वरील कल्पनेस मानाचें स्थान दिलें आहे.

'तत्त्वज्ञ राजा' हा प्लेटोनें सुचविलेल्या आदर्श राज्यकर्त्याचा नमुना होय. अनेक शतकें लोटलीं, परंतु या कल्पनेची न्याय्य तपासणी प्रयोगानें कधीं केली गेली नाहीं. अलीकडे हुकूमशहांच्या रूपानें तिचा विकृत प्रकार मात्र पहावयास मिळाला. आजकालच्या व्यवहारवादी (Pragmatic) युक्तिवादामुळें तत्त्वज्ञानाचें विचारक्षेत्रांतून केव्हांच उच्चाटन झालें आहे! राजेशाही ही विद्यमान कालाशीं विसंवादी ठरली आहे. अशा स्थितींत 'तत्त्वज्ञ राजा' संबंधीं बोलावयाचें म्हणजे उपहासास पाचारण करण्यासारखें आहे. तरीसुद्धां तें चिंतन हितप्रद ठरणार आहे.

राजानेंच 'तत्त्वज्ञ' कां असावयाचें ? जीवनाच्या विविध क्रियांचें आकलन ज्या ज्ञानामुळें होऊं शकतें, जीवनशैली-(way of life)चा विकास ज्यामुळें साधतां येतो आणि अलिप्ततेची व अनासक्तीची वृत्ति ज्यामुळें अंगीं बाणूं शकते अशा प्रकारचें ज्ञान व गुण आदर्श राज्यकर्त्याच्या ठिकाणी प्रामुख्यानें असावेत असा प्लेटोच्या मनांतील आशय असावा. राजा किंवा राज्यकर्ता हा कृतिशील पुरुष होय. तो तत्त्वज्ञानी असल्यास त्याच्या कारभारामागें व कृतीमागें ज्ञान व अनासक्त बुद्धीचें मार्गदर्शन राहील. म्हणजे कोणत्याहि (राजकीय) कृतीस नैतिक जाणीवेची व कर्मास (पूर्व) विचाराची आवश्यकता प्लेटोनें प्राप्त करून दिली. त्यायोगें कोणत्याहि कृतीची थोरवी अगर मूल्य ठरविण्यास कांहीं मार्ग उपलब्ध होतो.

सांप्रतची प्रवृत्ति अशी आहे कीं, यशस्वी राजकारणी मंडळी काय करतात व त्यांच्या कृतींची प्रत्यक्ष योग्यता काय आहे याची विचारपूस करूं नये. शासनसत्तेचें कार्यक्षेत्र अधिकाधिक प्रमाणांत विस्तार पावत आहे. राजकीय व्यवहाराची नैतिक विचारापासून अधिकाधिक फारकत होत चालली आहे. अशा वेळीं प्लेटोनें सुचविलेल्या कल्पनेचें व्यावहारिक व समयोचित महत्त्व ध्यानीं येतें. राजा म्हणजे एक (समाजसंस्था) किंवा राजाचें वैयक्तिक स्थान या दृष्टीनें विचार करावयाचा नाहीं. राजाचें कार्य कोणतें तें पहावयाचें आहे. तें कार्य राज्यकारभाराचें होय. हें कार्य कांहीं मानदंडांना अनुसरून चालावें व हे मानदंड ज्ञान व अनासक्त बुद्धि (spirit of detachment) यांतून निष्पन्न व्हावेत, ह्याचीच आवश्यकता आहे.

लोकशाहीमध्यें राजाला स्थान नसलें तरी राज्यकारभाराचें कार्य रहाणारच आहे. लोकशाहींत तें कार्य प्रत्येक व्यक्तीचें आहे असें समजण्यांत येतें. या अर्थानें प्रत्येक नागरिक हा राजा किंवा राज्यकर्ता आहे असें म्हणतां येईल. तेव्हां राज्यकर्त्याच्या ठिकाणीं हवे असलेले गुण प्रत्येक नागरिकांत असणें अवश्य आहे.

येथेंच लोकशाहीस पायाभूत असणाऱ्या शिक्षणाचें महत्त्व ध्यानीं येतें. शास्त्रीय ज्ञाना-(Scientific

* कलकत्ता येथून निघणाऱ्या 'रॅडिकल ह्यूमॅनिस्ट' या साप्ताहिकाच्या विशेषांकांत प्रसिद्ध झालेल्या लेखाचा हा सारांशरूप अनुवाद आहे.– अनुवादक.









अनुक्रमणिका

knowledge ) चा प्रसार व विवेचक बुद्धीला अवाहन ( appeal to reason ) या मार्गांनीं जनमत सुशिक्षित करण्याचें काम हातीं घ्यावयास पाहिजे. ही जबाबदारी पार पाडणारी मंडळी फार दिसत नाहींत. त्यांना तें काम दीर्घकालचें व अनिश्चित स्वरूपाचें वाटतें. त्यांना तात्काल फलदायी व जवळचे रस्ते पाहिजेत. सत्ता व कायदा यावर त्यांची भिस्त आहे. परंतु जवळचे मार्ग ( Short Cuts ) हे लोकशाहीप्रत नेत नाहींत तर तिच्या विनाशाकडे नेतात. तथापि लोकशाहीसंबंधीं खरी चिंता व कळकळ वाटत असेल तरच योग्य रीतीनें पावलें टाकून तिचा नाश थांबवतां येईल.

लोकशाही म्हणजे राज्यव्यवस्थेचें विशिष्ट स्वरूप किंवा राज्यकारभाराचें केवळ एक तंत्र नव्हे. जीवनाचा तो एक व्यापक व सुसंबद्ध दृष्टिकोन आहे. तो दृष्टिकोन, तें जीवनाचें तत्त्वज्ञान माहित असावयास पाहिजे व समजूनहि घेतलें पाहिजे. त्या आकलनाच्या अभावीं लोकशाहीसंबंधीं वाटणारी चिंता भावनाप्रधान किंवा विचार न करतां स्वीकारलेला एक फॅशनचा प्रकार ठरेल!

सद्यःकालांतील बहुसंख्य नागरिकांत या दृष्टिकोनाविषयीं अज्ञान आहे. त्यामुळें एखादी योजना वा कृति ही लोकशाहीला धरून आहे का तद्विरुद्ध आहे, तिजमुळें लोकशाहीची वृद्धि होईल का नाश होईल, हें ते ओळखूं शकत नाहींत. बऱ्याचशा सुशिक्षितांची ही अवस्था आहे. त्यामुळें लोकशाही जीवनशैलीच्या कल्पनांनीं ज्यांच्या मनास स्पर्श केला नाहीं असेच बरेचसे सभासद विधिमंडळांत आढळून येतील. अशा स्थितींत व्यक्तिस्वातंत्र्य व स्वतंत्र विचार यांना सतत अडथळा आणणारे व त्यांचा संकोच करणारे लोकशाहीविरोधी उपक्रमच योजिले जावेत आणि ते माणसांना सच्छील, नीतिमान्, सभ्य 'केवळ पंखांचाच अभाव असलेले देवदूत' करण्याच्या उच्च हेतूनें योजिले जावेत व कायद्याच्या पुस्तकांत त्यांना स्थान मिळावें यांत नवल नाहीं. एका ॲथीनियन प्रवाश्यानें स्पार्टन लोकांपुढें काढलेल्या उद्गारांची आठवण येथें झाल्यावांचून रहात नाहीं. ते असे : " लोकशाही ही काय चीज आहे हें सर्व शहाण्या लोकांना ठाऊक आहे. मी तर त्यांतून पोळून निघालेला असल्यामुळें मला तें ज्यास्तच कळतें. पण या मान्यता पावलेल्या वेडेपणाविषयीं नवीन असें बोलावयाचें तरी काय ? "

लोकशाही दृष्टि एकदम व थोडक्या कालावधींत उत्पन्न होणार नाहीं, हें खरें. म्हणून तर आतांपासूनच योग्य दिशेनें कांहीं प्रयत्न करण्याची जरूरी आहे. लोकशाहीचीं कांहीं गृहीत तत्त्वें मान्य करून तदनुसार लोकशाहीच्या शिक्षणाचाच अल्पावधींतील व तत्काळ अंमलांत आणावयाचा कार्यक्रम आंखणें शक्य आहे. निरनिराळ्या प्रसंगीं प्रत्यक्ष कृतीनें या तत्त्वांचा उपयोग करण्यानें लोकशिक्षण साध्य होऊं शकेल. नवमानवतावादी ( रॅडिकल ह्यूमॅनिस्ट ) वाङ्मयांत असे तत्त्वविचार सहज सांपडू शकतील. ते विचार स्पष्ट करण्यासाठीं कांहीं गृहीत कृत्यें ( postulates ) पुढें दिलीं आहेत :

( १ ) मानव हा स्वतःच अंतिम साध्य आहे. साधन म्हणून त्याचा उपयोग होऊं नये. म्हणून मानवी हक्क हे शासनसत्तेच्या हक्कांहून श्रेष्ठ आहेत.

( २ ) प्रथम व्यक्ति, नंतर समाज येतो. व्यक्तिहित हेंच सामुदायिक वा समाजहिताचें कार्य आहे.

(३) स्वातंत्र्य हेंच सर्व मानवी–वैयक्तिक किंवा सहकार्य युक्त प्रयत्नाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

( ४ ) मानवी व्यक्ती बुद्धिवादी आहेत. म्हणजे इष्ट काय, अनिष्ट काय याचा निर्णय करण्याची विवेचक बुद्धि त्यांना प्राप्त झाली आहे. यासाठीं सार्वजनिक मत हें अखेरचें न्यायालय मानावें.

( ५ ) व्यक्ति ही विवेकी असते. 'आपलें स्वातंत्र्य दुसऱ्याच्या स्वातंत्र्याशीं संबद्ध आहे, म्हणून दुसऱ्याच्या अकल्याणांत वा नाशांत आपलें हित नाहीं ' या विवेकयुक्त जाणीवेनें आपल्या वांट्यास आलेल्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ अवश्य अशा कांहीं बंधनांचाहि व्यक्ति स्वीकार करील.

हीं सूत्रें परिपूर्ण आहेत असा दावा येथें करावयाचा नाहीं. त्यांत फेरफार करावा किंवा तत्सदृश नवीं मांडावीत. मुद्दा इतका आहे कीं अशासारखीं गृहीतकृत्यें लोकशाहीचीं पायाभूत मूलतत्त्वें म्हणून स्वीकारण्यांत यावींत.

हा मार्ग पतकरण्यांत बरेच फायदे आहेत. एक म्हणजे लोकशाहीच्या शिक्षणाचें कार्य आज वाटतें त्याहून अधिक सुलभ व अर्थपूर्ण होत जाईल. वर








सूचित केलेल्या सूत्रांमागें शास्त्रशुद्ध ज्ञानाचा भक्कम आधार आहे. सर्वांना कळूं शकेल अशा रीतीनें तें ज्ञान देतां आलें पाहिजे. परंतु या कार्यांत गुंतलेल्यांची आज अनेकदा अशी भावना होते कीं शास्त्र व तत्त्वज्ञानाचे पाठ आपण लोकांच्या भाषेंत देतों खरे, परंतु त्यांचे सुपरिणाम दिसून येत नाहींत. उलट ज्यांना हें शिक्षण मिळत आहे, त्यांना प्रत्यक्ष जीवनांत त्या शिक्षणाचें महत्त्व केवढें आहे हें शिक्षणतज्ज्ञांनीं कितीहि बिंबविण्याचा यत्न केला तरी तें अगदीं ' अव्यवहार्य ' वाटतें.

परंतु वरील तत्त्वांचा स्वीकार झाला तर आपल्या हिताशीं संबद्ध असलेल्या गोष्टीसंबंधानें आपण परिणामकारक मतप्रदर्शन करूं शकतों. असें एकदां लोकांना कळून आलें कीं परिस्थितींत वेगळाच बदल होईल. उदाहरणार्थ, सरकारनें मंजूर केलेली एखादी योजना विचारार्थ घ्यावी. लोकांच्या साक्षात् जीवनांत तिचे परिणाम काय होतील, जनतेचें हित व स्वातंत्र्य यांच्याशीं ती सुसंगत आहे कीं नाहीं इत्यादींची सांगोपांग चिकित्सा होऊन ती जर लोकमतानें नकोशी ठरली तर सरकारनेंहि ती बळें अंमलांत आणूं नये. अशा रीतीनें सरकार हें अशा प्रकारच्या सुबुद्ध व विधायक लोकमताची बूज राखतें असें लोकांना दिसून आलें तर लोकशाहीच्या कल्पनांचा प्रत्यक्ष जीवनांत कसा संबंध येतो हें त्यांना तेव्हांच कळून येईल. सरकारच्या कृतीबाबत व धोरणाबाबत विधायक व तत्त्वपूर्ण टीका करण्याचा मार्गहि त्या योगें खुला होईल. निवडणुकीवर दृष्टि ठेवून सरकारला अडचणींत टाकण्याची प्रवृत्ति कमी होत जाईल.

या सूचित केलेल्या उपायांचा किमान हा तरी लाभ होईल कीं, त्यामुळें लोकशाहीला कांहीं नेमका अर्थ येईल, तिची व्याख्या करतां येईल. सद्यःस्थितींत इतर राजकीय कल्पनांपासून लोकशाहीचें नेमकें वेगळेपण कशांत आहे हें दर्शवितांच येत नाहीं. लोकशाहीची जी कांहीं व्याख्या असेल ती पाठ्यपुस्तकांत. त्या व्याख्येचा मागमूस प्रत्यक्षांत आढळत नाहीं. पुस्तकी व्याख्यांचा आशय असा कीं लोकांनीं चालविलेलें राज्य म्हणजे लोकशाही. पृथ्वीवर लोकांनीं चालविलेलें राज्य कुठेंच दिसत नाहीं हें बहुधा प्रत्येकास माहित असतें. कम्युनिझमशीं तुलना करतां लोकशाहीचें जाणविणारें हें एक दौर्बल्य आहे. कम्युनिझमला कांहीं ठराविक अर्थ आहे. जो कम्युनिस्ट नाहीं त्याला तसें म्हणवून घेण्याचा मोह होणार नाहीं; तसें त्यानें केलें तर त्यांतून सुटका करून घेणें सुलभ नाहीं. पण लोकशाहीच्या बाबतींत सर्वच प्रकार वेगळा. कोणासहि स्वतःस लोकशाहीवादी म्हणवून घेतां येतें व घेतातहि. लोकशाहीवादी हे लोकशाहीवादी आहेत; समाजवादी हेहि लोकशाहीवादी आहेत; कम्युनिस्टहि लोकशाहीची शपथ वाहतात. रशियन लोकांनीं ' लोकांच्या लोकशाह्या ' ( People's Democracies ) हा नवीन प्रकार अस्तित्वांत आणला आहे. चँग-काई-शेक हा लोकशाहीवादीच होता व असेलहि. आपण भारतीयांनीं लोकशाहीचा सर्वात महान् प्रयोग सुरूं केला आहे असें चेस्टर बौल्स इत्यादि अमेरिकन आवर्जून सांगतात. अमेरिकनहि आपणांस हे जगांतील सर्वश्रेष्ठ लोकशाहीवादी म्हणवितात. तात्पर्य, असा एकहि पक्ष नाहीं– मग तो कितीही प्रतिगामी किंवा गटनिष्ठ असो– कीं ज्याला लोकशाहीची झूल पांघरतां येत नाहीं व ' फिट ' बसत नाहीं ! याचा परिणाम म्हणजे विचारांचा पूर्ण गोंधळ. अशा स्थितींत लोकशाहीच्या खऱ्या शिक्षणाचे होत असलेले कसलेहि प्रयत्न परिणामशून्यच व्हावयाचे. कशासच बांधलें न जाण्याचें लोकशाहीचें जें सांप्रतचें वैशिष्ट्य आहे ( blissfully non-committal character of democracy ), तें जर कांहीं पालटूं शकलें, कांहीं किमान कृतींना तिनें बांधून घेतलें तर वेगळी परिस्थिति उत्पन्न होईल.

राज्यकर्त्यांकडूनच कांहीं उदार हालचाल झाली तर परिस्थितींत विलक्षण फरक पडेल यांत शंका नाहीं. केवळ सत्ताच चालविणें असेल तर प्रश्न वेगळा. पण राज्य हें नीतीनें व शहाणपणानें चालवावयाचें असेल तर राज्यकर्त्यांनीं हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं जनता लोकशाहीच्या सज्ञान व परिपक्व स्थितीस येईपावेतों जनतेच्या सत्तेचे आपण रक्षक व विश्वस्त आहोंत मग त्यांनीच लोकांना लोकशाहीपद्धतीस पात्र होण्याच्या क्रियेस साहाय्य करावें. त्यायोगें आपण सत्तेकरतां सत्तेमागें नाहीं असें दिसून येईल व खऱ्या तत्त्वज्ञाचें शहाणपण व अलिप्तता आपल्यापाशीं आहे असें सिद्ध होईल. चांगल्या अर्थानें ते ' तत्त्वज्ञ राजे ' होतील.

राज्यकर्ते तत्त्वज्ञ असावेत या मागणीमागील हेतु हा कीं जे स्वतःस लोकशाहीवादी समजतात त्यांनीं एतद्विषयक सदसद्विवेकबुद्धीचें मंथन करावें.








प्रा. गोविन्द केशव भट

# ऋग्वेदांतील 'मृत्यु-सूक्त' आणि जीवनविषयक दृष्टि

मृत्यु ही मानवी जीवनांतील एक दुर्धर घटना आहे. टाळूं म्हटलें तरी मृत्यु टळत नाहीं. मृत्यूच्या कराल जबड्यांत सर्व जगताचा चक्काचूर होऊन जातो. विश्वविजेत्यापासून तो एखाद्या क्षुद्र जंतूपर्यंत सर्व वस्तुजाताला अक्षरशः धूळ चारण्याचें सामर्थ्य ह्या प्रलयंकारी, सर्वशक्तिमान् मृत्यूंत आहे. प्राण्यांची गोष्ट कशाला ? विश्वावर आपल्या वैभवाची अमर्याद पांखर घालणाऱ्या महान् संस्कृतीहि या मृत्यूनें आपल्या उदरांत पचवून टाकल्या आहेत आणि केवळ नामशेष करून ठेवल्या आहेत.

म्हणूनच मृत्यूचें भय कुणाला सुटलें नाहीं. मृत्यूवर विजय मिळविणारा एखादा उपनिषत्कालीन नचिकेता सोडला, महाभारतांत वर्णिलेली सावित्री सोडली, किंवा योगसामर्थ्यानें परब्रह्माला वश करून घेणारे ऋषि-मुनि, साधु-संत सोडले तर असा कोण आहे कीं जो नुसत्या मृत्यूच्या कल्पनेनें सुद्धां चळचळां कांपणार नाहीं ?

जगताच्या कोमल, प्रेमळ, सुंदर स्वप्नांचा विध्वंस करून, वस्तुजाताला जीवनांतून कायमचें उठवून नेणारी मृत्यु ही एक निष्ठुर, अनिवार्य शक्ति आहे. या मृत्यूनें होणाऱ्या दारुण, भीषण शोकाचा पूर कसा थांबवितां येणार ? मृत्यूनें निर्माण केलेलें दुःख अटळ असलें तरी तें जीवनाला भाजून काढल्याशिवाय कसें राहील ? मृत्यूचें दुःख खरोखरच अपरंपार आहे. मृत्यूच्या कल्पनेनें अर्जुनासारख्या प्रचंड धनुर्धराचेहि हातपाय गळून गेले. इंदुमतीच्या मरणानें अजासारखा विवेकशील, धीराचा, रघुवंशीय राजाहि आपला शोक आवरूं शकला नाहीं आणि शेवटीं त्यानें आपल्या देहाचें संगमांत विसर्जन केलें. रतीसारखी कोमल मनाची, पतिप्रेमानें भारलेली तरुण स्त्री, मदनाचा दाह झाल्यावर, हंबरडा फोडून शोक करूं लागली ! कवींनीं केलेल्या या वर्णनांत मानवी हृदयाचें आ-क्रंदनच ऐकूं येत आहे, यांत शंका नाहीं.

मृत्यूमुळें होणाऱ्या चिरवियोगाचें दुःखच असें आहे कीं तेथें धीराचा धीर सुटतो, जाणिवेची नेणीव होते, कळत असूनहि वळेनासें होतें. आत्मा अमर आहे आणि देह नाशवंत आहे, हें कां कोणाला माहीत नाहीं ? विलयाचा हा अकल्प्य खेळ अटळ आहे हें प्रत्येक जण जाणून असतो; अथवा, अजाणतेपणानें कां होईना, हरघडीला येणाऱ्या जगाच्या अनुभवांतून या अदय सत्याची ओळख सर्वांना पटलेली असते. आणि तरीहि, जाणते आणि अजाण, सर्वच जण या दुःखाच्या फेऱ्यांत सापडले कीं दीन होऊन जातात. तेथें श्रीकृष्णाचें तत्त्वज्ञान अपुरें पडतें, वसिष्ठाचा धीरगंभीर उपदेश लटका पडतो. मृत्यूचें सत्यच इतकें भेसूर आहे कीं त्यापुढें जीवनाचें सत्य कावरेंबावरें होऊन जातें !

हें असें व्हावें यांत नवल नाहीं; कारण ही जगताच्या चिर-अनुभवाची एक गोष्ट आहे. या दुःखाविषयीं वाद घालतां येत नाहीं. कारण ती जीवनांतील एक निर्विवाद अनुभूति आहे. माझ्यापुढील प्रश्न वेगळाच आहे. मरणाची अपरिहार्यता जाणून, मृत्यूचें भय स्वीकारून आणि या चिरवियोगाचें असीम दुःख कळत असूनहि, मला असें विचारावयाचें आहे कीं मृत्यूच्या घटनेला उद्देशून आमचा जो सामाजिक आचार आहे तो बरोबर आहे काय ? वेगळ्या शब्दांत हेंच विचारावयाचें तर मृत्यूच्या संबंधांत आमची जीवन-दृष्टि असावी तशीच आहे काय ?

माझा प्रश्न चमत्कारिक वाटत असेल तर मी असें म्हणतों की, आमची जीवनविषयक दृष्टि हीच मृत्यूच्या घटनेची खरी कसोटी आहे. या प्रश्नाचा मानवाच्या दृष्टीनें विचार केला -- आणि मानवांनीं मानवाचा विचार करूं नये तर काय करावें ?-- तर, मृत्यूसंबंधींचें मानवी सत्य मृत्युविषयक तत्त्वज्ञानांत नाहीं, मरणाच्या भीतींत नाहीं कीं शोकांत नाहीं असें मला वाटूं लागतें. मृत्युविषयक तत्त्वज्ञानानें आम्हांला काय शिकवलें तर "मरणं प्रकृतिः शरीरिणां विकृतिर्जीवितम्








उच्यते "! म्हणजे या तत्त्वज्ञानानें मानवी जीवितालाच विकृति ठरवून जीवनाचाच अपहार केला आहे ! या तत्त्वज्ञानांत जीवनाचें उदात्तीकरण असेल. पण तें जीवनाचा स्पर्श टाळून केलेलं आहे. या तत्त्वज्ञानाची पकड आज हजारों वर्षें आमच्या जीवनाला व्यापून बसलेली अहे. या तत्त्वज्ञानाचाच पर्याय म्हणजे जग असार आहे, जग माया आहे, सत्य काय तें " निहितं गुहायाम् ", या जगापासून दूर, गुहेंत दडवून ठेवल्यासारखें गूढ आहे हीं महावाक्यें ! तात्त्विक दृष्टीनें हें सगळें खरें असेलहि; परंतु मृत्यूची तलवार मानेवर सारखी लटकत ठेवून प्रत्येक क्षणाला जीवनाचा वध करणारें हें तत्त्वज्ञान सामान्य मानवी जीवनाला किती उपकारक झालें आहे याचा विचार नको का करायला ? या तत्त्वज्ञानांतून संन्यासाचा पंथ निघाला. आणि या विचारसरणीचा प्रभाव आमच्या जीवनावर इतका झाला कीं, सर्वच मानव जरी हिमालयाच्या दिशेनें चालूं लागले नसले तरी, मानवी जीवनाला मात्र भगवा रंग आला, जीवनाच्या आनंदाची मात्र राख झाली !

मृत्यूचें भय आणि मृत्यूचा शोक दोन्ही तरून जाण्याचा मार्ग म्हणून वरील तत्त्वज्ञान उपयोगी पडतें म्हणावें तर तें फारच थोड्यांच्या बाबतींत पडत असलें पाहिजे असें मानवी अनुभवांवरून दिसतें. वर उल्लेखिलेल्या साहित्यांतील उदाहरणांचा, आणि मृत्यूच्या किंवा चिरवियोगाच्या दुःखाला कवींनीं जी हृदयद्रावक वाचा फोडली आहे तिचा अर्थ काय ? हा शोक, हें दुःख, सत्याचा अपलाप करणारें आहे असें तर म्हणावयाचें नाहीं ना ? मानवी जीवनाची जी एक सार्वत्रिक आणि वैयक्तिक अनुभूति आहे तिला खोटी म्हणण्यानें, तिच्यावर तत्त्वज्ञानाचा मुलामा चढविल्यानें, त्या अनुभूतीचें क्षणाक्षणाला जाणवणारें प्रखर अस्तित्व नाबाद होण्याची शक्यता फारच कमी आहे. याच्या उलट, मरणाच्या ह्या सत्याचा स्वीकार करण्यानेंच जीवनाचा अर्थ नीट लागूं शकेल. म्हणूनच मी वर म्हटलें कीं मरणाची खरी कसोटी जीवनविषयक दृष्टींतच नीट सांपडूं शकेल.

मरणाकडे पाहाण्याची वैयक्तिक दृष्टि भयाची, शोकाची असेल, किंबहुना तशी ती असावी यांतच मानवाचें मानव्य आहे. परंतु मृत्यूच्या घटनेविषयीं आमची सामुदायिक, सामाजिक जी दृष्टि आहे तिच्यावर माझा कटाक्ष आहे. या दृष्टीचें हवेंतलें रूप म्हणजे जीविताला विकृति समजणारें वरील तत्त्वज्ञान. आणि या दृष्टीचें प्रत्यक्ष व्यवहारांतील रूप म्हणजे मृत्यूच्या प्रसंगीं नेहमींच दिसून येणारें चिरपरिचयाचें करुण-भीषण दृश्य आणि अंत्यविधीच्या वेळचें वातावरण.

मरणानें निर्मिलेलें व्यवहारांतील कारुण्य आणि भीषणता आपण कोणीच दृष्टीआड करूं शकणार नाहीं. आणि त्यांत कांहीं दुबळेपणा आहे असें म्हणण्यापेक्षां, मानवाच्या धगधगत्या हृदयाचें प्रतिबिंबच त्यांत पडलेलें असतें असें मला वाटतें. मात्र अंत्यविधीच्या वेळचें जें वातावरण असतें त्यांत मला तरी निर्दयपणाच आढळून येतो. मृत मनुष्य तर या जीवनांतून उठूनच गेलेला असतो. त्याच्या अपरंपार शोकांत मृताचे आप्त विचारें बुडून गेलेले असतात. परंतु या आप्तांच्या भोंवती जो मेळावा जमलेला असतो, त्याची वृत्ति काय असते ? कांहींजण त्या आप्तांबरोबर अश्रू गाळीत असतात, ऊर पिटीत असतात. कांहीं लांब चेहरे करून उभे असतात. कांहीं तत्त्वज्ञान सांगण्याचा आविर्भाव करीत असतात. उलट, कांहीं व्यवहारी माणसें आपले टक्के आणि दक्षिणा यांच्यावरच नजर ठेवून असतात. आणि असाहि एक वर्ग असतो कीं जो उपचार म्हणून या विधीच्या वेळीं जमा झालेला असतो; परंतु ह्या वर्गाची खासगी बोलणीं-चालणीं, किंबहुना त्यांचे थट्टाविनोदहि दबलेल्या आवाजांत चालूच असतात ? मृताच्या भोंवतीं हें जें वातावरण तयार होत असतें यांत काय तत्त्वज्ञान भरलेलें आहे. या मेळाव्याचा मृताच्या आप्ताला काय सांत्वनपर फायदा होतो हें मला तरी अजून कळलेलें नाहीं ! तत्त्वज्ञान राहिलें बाजूला. या वातावरणांत मला तरी वंचना, ढोंग आणि म्हणूनच निर्दयपणा आहे असें वाटतें. आणि याचें कारण हेंच कीं, जीवनविषयक खरी दृष्टिच कुठेंतरी दडून बसली आहे आणि म्हणूनच जीवनाचा कोरडा अपलाप करतांना, आम्ही मृत्यूच्या दुःखाचीहि एका परीनें निर्दय वंचना करीत असतों. या वंचनेनें मृताच्या दुःखानें जखमी झालेला आप्त पुन्हां एकटा तो एकटाच राहतो. जगाचें चक्र जें चालूं असतें तें असतेंच. वियोगाच्या धक्क्यानें








जीवनाची नश्वरता जाणवून त्याचा जीवनावरचा विश्वासहि ढासळूं लागतो. वरील उदात्त तत्त्वज्ञानाचा आणि त्यामुळें आलेल्या जीवनविषयक दृष्टीचा तर हा परिणाम नाहीं ना ? असो किंवा नसो, परंतु आमच्या जीवनांत ही वंचना शिरली आहे हें तर खरें ना ? म्हणूनच माझां प्रश्न आहे कीं, हें सारें योग्य आहे काय ?

अगदीं प्राचीन काळचा भारतीयांचा जीवनविषयक दृष्टिकोन पाहिला तर तो आतांच्या सारखा नव्हता असें दिसून येतें. हें समजण्यासाठीं मोठमोठे ग्रंथ धुंडाळायला नकोत कीं शास्त्रें आलोडन करायला नकोत. फक्त ऋग्वेदासारखा एखादा ग्रंथ – आणि त्यांतलीं मृत्यु-सूक्तेंच तेवढीं पाहा. म्हणजे मी काय म्हणतों तें कळून येईल. ऋग्वेदाच्या सातव्या मंडलांतील ८९ वें, आणि दहाव्या मंडलांतील १५, १६, १७ आणि १८ एवढींच काय तीं सूक्तें कीं ज्यांत मृत्यूविषयीं विचार व वर्णन आलेलीं आहेत. त्यांतल्या त्यांतहि दहाव्या मंडलांतील १८ वें सूक्त, जें '**मृत्युसूक्त**' म्हणूनच ओळखलें जातें तें पाहाण्यासारखें आहे.

या **मृत्युसूक्तां**तील [1] वर्णन मृतदेहाला पुरण्याच्या संस्काराला लागूं पडतें, का अग्निसंस्काराला लागूं पडतें ही महत्त्वाची गोष्ट नाहीं. कारण जुन्या काळीं दोन्हीहि होत असतील व पुढें अग्निसंस्कारालाच धार्मिक मान्यता मिळाली असली पाहिजे. तसेंच या सूक्तांमधील ७ व्या ऋचेंतील कांहीं शद्बांच्या अर्थाचा अनर्थ करून, सतीच्या प्रथेला ऋग्वेदाचा आधार शोधण्याचें जें कारस्थान कांहीं कर्मठ धर्मनिष्ठांनीं केलें होतें त्याकडेहि आतां लक्ष देण्याचें कारण नाहीं. या बाबी ऐतिहासिक कुतूहलाचा विषय म्हणूनच आज उरल्या आहेत. परंतु या सूक्तांतून सामाजिक जीवनाचें जें चित्र आहे, विशेषतः जीवनविषयक दृष्टि जी यांत प्रतिबिंबित झालेली आहे ती हजारों वर्षांनंतर आजहि ताजी वाटावी इतका जिव्हाळा आणि ओलेपणा त्यांत आहे असें मला वाटतें.

या सूक्तांतील सर्वच वर्णन इतकें बोलकें आहे कीं अंत्यविधीचें समग्र चित्र आपल्या डोळ्यांसमोर स्पष्ट उभें राहावें. वसतीपासून दूर, स्मशानभूमीवर एका शुद्ध केलेल्या जागेवर मृतदेह ठेवलेला आहे. मृताचीं उपजीविकेचीं आयुधें [–मुळांत 'धनु' म्हणजे धनुष्याचा उल्लेख आहे; हें एका क्षत्रियाच्या दफनाचें वर्णन आहे हें उघड आहे– ] त्याच्या हाताशीं ठेवलेलीं आहेत. त्याची विधवा पत्नी उशाशीं बसलेलीं आहे. आप्त आणि मित्रपरिवार स्मशानभूमीवर जमा झालेला असून हे सर्व लोक एका विस्तृत वर्तुळांत मृताभोंवतीं उभे आहेत. आतां अंत्यविधि करविणारा पुरोहित एक दगड घेऊन या दीर्घ वर्तुलांत एका जागीं ठेवतो. हा "परिधि" होय. जीवन-मरणाची सीमारेषा दाखविणारें हें चिह्न आहे. या परिधीच्या पलीकडे सजीव जीवांनीं जावयाचें नाही; परंतु ही मर्यादा सांभाळण्याची प्रार्थना पुरोहित मृत्यूलासुद्धां करीत आहे :

" हे मृत्यो ! तुला डोळे आहेत, कान आहेत; म्हणून मी तुला सांगतों. मृत्यूची पाऊलवाट बुजवीत आम्ही इथवर आलों आहोंत. या परिधीनें मृत आणि सजीव यांची भिन्न विभागणी झाली आहे. हा परिधि मी जिवंत माणसासाठीं ठेवलेला आहे. कोणीहि जिवंत व्यक्ति याच्या संनिध न येवो. दिवस-रात्र, ऋतु किंवा मोठे-धाकटे जसा आपला अव्याहत क्रम पाळतात तोच वडीलकीचा, प्रथमपणाचा क्रम येथेंहि पाळला जावा आणि विधात्यानें योजिलेल्या आयुर्मर्यादेला बाध येऊं नये ! मृत्यो ! तूं आपल्या मार्गानें निघून जा ! आमची प्रजा, आमचे वीर यांना तूं मारूं नकोस. आमच्या पापाचा नाश होऊन, पुत्र आणि धनलाभानें आमची भरभराट होवो ! आमचें आयुष्य शंभर शरदांच होवो ! आमच्या आयुष्याचा ऱ्हास होऊं नये ! मृत्यूच्या या मर्यादेपलीकडे जीवनाचें जग पसरलेलें आहे. तिकडे आम्हीं जात आहोंत–जीवनाच्या हास्यांत आणि जीवनाच्या नृत्यांत भाग घ्यावयाला, दीर्घ आयुष्याच्या वरदानानें जीवनाचें सुख भोगायला ! "

–( ऋचा १ ते ६ )

जीवनाच्या आनंदाचे हे शीतल तुषार जमलेल्या जिवंत माणसांच्या अंगावर शिंपडल्यावर, पुरोहित पुढील धार्मिक विधीला आरंभ करतो. काजळ घातलेल्या, रत्नादिकांचे अलंकार ल्यालेल्या सुवासिनी आतां पुढें येतात. डोळयांत अश्रु येऊं न देतां, हृदयांत

[1] मूळ '**मृत्युसूक्त**' लेखाच्या शेवटीं दिलें आहे.









दुःखाचा आवेग उमलूं न देतां या सुवासिनी वर्तुलाच्या मर्यादेच्या आंत येऊन मृत देहावर घृत ओततात आणि मग घराच्या दिशेनें पहिलें पाऊल टाकतात ! ( ऋचा ७. ) नंतर मग, मृताचा सर्वांत जवळचा आप्त मृताच्या पत्नीजवळ येतो, हात देऊन मृताच्या उशाजवळून तिला उठवतो आणि तिला म्हणतो :

“ स्त्रिये ! ऊठ. जिवंत माणसांच्या जगाकडे तूं आतां वळलें पाहिजे. एका वेळीं ज्यानें तुझें पाणिग्रहण केलें तो तुझा पति आतां राहिलेला नाहीं. तूं तुझी पत्नीपदाची जबाबदारी पुरी केली आहेस. त्याच्या मुलांची तूं माता आहेस ! ” ( ऋचा ८ )

आणि सजीव जगताकडे परत फिरतांना हा आप्त मृताचीं आयुधें आपल्या जिवंत हातांत घेतो. जीवनाच्या सातत्याचें, जीविताच्या सजीवपणाचें हें एक प्रतीकच होय. हीं आयुधें ग्रहण करतांना, मृताच्या रूपानें नाहींसा झालेला जोम आणि शक्ति यांचा संचार पुन्हां होऊन शत्रूंवर विजय मिळावा ही भावना आप्ताच्या मुखानें प्रकट होते. ( ऋचा ९. )

यापुढें, मृतदेह पृथ्वीमातेच्या हवालीं करण्यांत येतो, तिच्या संरक्षणाखालीं ठेवण्यांत येतो. या वेळीं प्रकट केलेली भावनाहि समजून घेण्यासारखी आहे. पुरोहित म्हणतो :

“ या पृथ्वीमातेजवळ तूं आतां जा. ही विशाल आहे आणि सुखमय आहे. लोकरीसारखी मृदु असलेली ही युवती ( पृथ्वी ) तुझा सांभाळ करो ! ”
–( ऋचा १० )

हृदयाची ही कोमल भावना प्रकट करून मग पुरोहित पृथ्वीला उद्देशून म्हणतो :

“ हे पृथिवि ! तूं या मृताला इजा करूं नकोस. तुझ्या पोटांत शिरायला त्याला अडचण करूं नकोस. याची काळजी घे. माता जशी आपल्या मुलाला पदराखालीं झांकून घेते तशी तूं याला घे ! ”

–( ऋचा ११. )

जमीनींत मृतदेह ठेवल्यावर माती लोटण्यांत येते. रजःकण खड्डयांत पडतांना स्तंभरूप ( pillars of dust ) धारण करतात; त्यांना १२ व्या ऋचेंत ‘ गृहासः ’ म्हणून संबोधलें आहे ; कारण धुळीचे हे अनंत स्तंभ हीं मृताचीं भविष्यकालीन घरें. ‘ वरवर उसळणारी ही पृथिवी ( माती ) नीट खालीं बसो. हजारांनीं मोजतां येतील अशी हीं (रजःकणरूपी) घरें असोत. तीं घृत पाझरोत आणि सर्वकाळीं त्याला शरण-स्थान होवोत. ” ( ऋचा १२ ).

खड्डा मातीनें भरल्यावर त्याचा पृष्ठभाग साफ करण्यांत येतो व त्यावर दगड ठेवण्यांत येतो. मृताशीं हा अखेरचा संपर्क. या दगडाला (परिधीला) स्पर्श करतांना मृत्यूशीं संपर्क येऊं नये ही प्रार्थना. यापुढें मृताची काळजी पितरांनीं आणि यमानें वहावयाची आहे. ‘ तुझ्यावर ही माती मी थापून बसवतों. वर हा दगड ठेवतांना मला ( मृत्यूची ) इजा न होवो. या स्थूणेला पितर तोलून धरोत. यम तुझ्यासाठीं इथें घरें रचो.”
–( ऋचा १३ )

शेवटचीं ऋचा कवीनें म्हटली आहे. मृत्यूचें वर्णन करतांना, शब्दद्वारा कवीचा संपर्क मृत्यूशीं आला. त्यामुळें भलता अनर्थ त्यावर येऊं नये. वाचेचा उपयोग पुढें तर करावयाचा आहेच. किंबहुना बाणाच्या टोंकाशीं पिसें तशी ही वेगवती वाचा आहे. परंतु सध्यांच्या संपर्काचा संभाव्य अनर्थ टाळण्यासाठीं कवि वाचा थांबवून धरतो. या खंडामुळें मृत्यूशीं आलेला तात्पुरता संबंध खंडित होईल आणि भविष्यकाळीं पुन्हा वाचेचें उच्चारण मोकळेपणानें करतां येईल. ‘ बाणांच्या पिसाप्रमाणें ( ही वाचा ) माझ्या ( देहांत ), येणाऱ्या दिवसासाठीं, ठेवली आहे. लगामानें घोड्याला थांबवून धरावें त्याप्रमाणें मी पुढील वाचेला धरून ठेवतों. ” –( ऋचा १४ )

रडारडी, बेफिकिरी, कोरडें तत्त्वज्ञान या सर्वांपासून हजारों वर्षे दूर असणारे या सूक्तामधील हे भाव कोणीकडे, आणि आजची निष्ठुर वंचना कोणीकडे ! या सूक्तांत गांभीर्य आहे, पण तें प्रेमळपणाला पारखें झालेलें नाहीं. यांत मृत्यूचा आणि मृताचा आदर आहे पण जीवनाचा अनादर नाहीं. एका अटळ घटनेचा मनावर पडलेला ताण आहे, परंतु त्यानें जीविताची रेशमी दोरी तुटलेली नाहीं. जीवन आणि मरण यांच्या सीमारेषांची स्पष्ट जाणीव आहे, परंतु मृत्यूची छाया पडून जीवन काळवंडून गेलेलें नाहीं. शोकाचे ढग तरळत असूनहि सुतकीपणाच्या धारा वाहात नाहींत. प्रसंगाचें गांभीर्य पदोपदीं जाणवत असूनहि सर्व वातावरणांत, निरागस जीवनश्रद्धेची एक हळुवार लहर तरळते











आहे. मृत्यूच्या संमुख उभे असूनहि जीवनाचा विश्वास कायम आहे. मातेच्या प्रेमळ हातानें आणि युवतीच्या मखमली स्पर्शानें मृताचा सांभाळ करण्याची प्रार्थना पृथ्वीदेवतेला करून, स्मशानभूमीवर जमलेला हा लोकवृंद कर्तव्यानें आणि हंसण्या-खेळण्यानें भरलेल्या जीवनाकडे परतत आहे. या परत फिरण्याची दिशा अलंकृत सुवासिनींनीं दाखवली आहे. आणि या जमावाबरोबर, जिच्यावर आकाशींची कुऱ्हाड कोसळली त्या मृताच्या पत्नीलाहि हात धरून, दिलासा देऊन, नेण्यांत येत आहे !

या मृत्यु-सूक्तांतील वातावरणांत, त्यांत प्रकट झालेल्या विविध भाव-भावनांत जी जीवनाची दृष्टि फांकलेली आहे तिनेंच मृत्यूचा, आणि जीवनाचाहि, खरा अर्थ प्रकट झाला आहे. या सूक्ताची मोहिनी पाश्चात्त्य मनांवरहि जी पडली आहे ती उगीचच का ? या जीवनदृष्टीला जर भौतिकवाद, जडवाद, उपभोगवाद अशीं नांवें देऊन हिणवायचें असेल तर तीहि एक घोर वंचनाच होय !

---

## मृत्यु-सूक्त

### ऋग्वेद १०–१८

ज्या मृत्युसूक्तासंबंधी कांहीं विचार वर प्रदर्शित केलें आहेत तें पुढीलप्रमाणें आहेः—

परं मृत्यो अनु परेहि पन्थां
यस्ते स्व इतरो देवयानात् ।
चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि
मा नः प्रजां रीरिषो मोत वीरान् ॥ १ ॥
मृत्योः पदं योपयन्तो यदैतत्
द्राघीय आयुः प्रतरं दधानाः ।
आप्यायमानाः प्रजया धनेन
शुद्धाः पूता भवत यज्ञियासः ॥ २ ॥
इमे जीवा विमृतैराववृत्रन्न –
भूद् भद्रा देवहूतिर्नो अद्य ।
प्राञ्चो अगाम नृतये हसाय
द्राघीय आयुः प्रतरं दधानाः ॥ ३ ॥
इमं जीवेभ्यः परिधिं दधामि
मैषां नु गादपरो अर्थमेतम् ।
शतं जीवन्तु शरदः पुरूची –
रन्तर्मृत्युं दधतां पर्वतेन ॥ ४ ॥
यथाहान्यनुपूर्वं भवन्ति
यथ ऋतव ऋतुभिर्यन्ति साधु ।
यथा न पूर्वमपरो जहाति
एवा धातरायूंषि कल्पयैषाम् ॥ ५ ॥
आरोहतायुर्जरसं वृणाना
अनुपूर्वं यतमाना यतिष्ठ ।
इह त्वष्टा सुजनिमा सजोषा
दीर्घमायुः करति जीवसे वः ॥ ६ ॥
इमा नारीरविधवाः सुपत्नी–
राञ्जनेन सर्पिषा संविशन्तु ।
अनश्रवोऽनमीवाः सुरत्ना
आरोहन्तु जनयो योनिमग्रे ॥ ७ ॥
उदीर्ष्व नार्यभि जीवलोकं
गतासुमेतमुप शेष एहि ।
हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं
पत्युर्जनित्वमभि संबभूथ ॥ ८ ॥
धनुर्हस्तादाददानो मृतस्या –
ऽस्मे क्षत्राय वर्चसे बलाय ।
अत्रैव त्वमिह वयं सुवीरा
विश्वाः स्पृधो अभिमातीर्जयेम ॥ ९ ॥
उपसर्प मातरं भूमिमेता –
मुरुव्यचसं पृथिवीं सुशेवाम् ।
ऊर्णम्रदा युवतिर्दक्षिणावत
एषा त्वा पातु निर्ऋतेरुपस्थात् ॥ १० ॥
उच्छ्वञ्चस्व पृथिवि मा निबाधथाः ।
सूपायनास्मै भव सूपवञ्चना ।
माता पुत्रं यथा सिचाऽभ्येनं भूम ऊर्णुहि ॥ ११ ॥
उच्छ्वञ्चमाना पृथिवी सुतिष्ठतु
सहस्रं मित उप हि श्रयन्ताम् ।
ते गृहासो घृतश्चुतो भवन्तु
विश्वाहास्मै शरणः सन्त्वत्र ॥ १२ ॥
उत् ते स्तभ्नामि पृथिवीं त्वत्
परीमं लोगं निदधन्मो अहं रिषम् ।
एतां स्थूणां पितरो धारयन्तु
तेऽत्रा यमः सादना ते मिनोतु ॥ १३ ॥
प्रतीचीने मामहनीष्वाः पर्णमिवा दधुः ।
प्रतीचीं जग्रभा वाचमश्वं रशनया यथा ॥ १४










रवीन्द्रनाथ ठाकुर : अनु० – आ. स. ज. भागवत

# गान्धारीचें आवेदन

**दुर्योधन** – तात, आपल्या चरणीं प्रणाम करतों.

**धृतराष्ट्र** – अरे दुराशया, तुझें अभीष्ट सिद्ध झालें ?

**दुर्यो०** – जय मिळाला आहे.

**धृत०** – आतां सुखी झालास ?

**दुर्यो०** – मी विजयी झालों आहें,

**धृत०** – अखंड राजत्व जिंकूनहि तुला सुख कोठें आहे, हे दुर्मति !

**दुर्यो०** – मीं सुख इच्छिलें नव्हतें, महाराज ! जय ! जय हवा होता मला. आज मी विजयी झालों आहें. क्षुद्र सुखानें क्षत्रियाची क्षुधा भागत नसते, हे कुरुपति ! जयरस म्हणजे भडकलेली अग्निमयी सुधा. ओीर्ष्यासिन्धूच्या मंथनांतून निघालेली ती सुधा मी नुकताच प्यालों आहे. तात ! सुखी नव्हे, आज मी जयी आहे. पिताजी, सुखी मी तेव्हां होतों, जेव्हां पांडव-कौरव एकत्र कुटुंबांत राहात होते — शशांका-च्या छातीवरील कलंकाप्रमाणें कर्महीन, गर्वहीन, दीप्तिहीन सुखांत ! सुखी मी तेव्हां होतों, जेव्हां अर्जुनाच्या गांडीवटणत्कारानें भयभीत होऊन शत्रु आमच्या दारीं येत नसत ! सुखी मी तेव्हां होतों, जेव्हां पांडव जयदृप्त करांनीं धरित्रीचें दोहन करून भ्रातृप्रेमानें त्यांतील कांहीं अंश आम्हांला देत असत आणि आम्ही अत्यंत कौतुकानें नित्य नवीन भोगसुख निश्चिन्त मनानें उपभोगीत असूं ! सुखी मी तेव्हां होतों, जेव्हां पांडवांचा जयध्वनि प्रतिध्वनित होऊन कौरवांच्या कानांवर आघात करीत असे आणि पांडवां-च्या यशोबिंबाचें प्रतिबिंब आपल्या उज्ज्वल अंगुलीनें कौरवांचें मलिन भवन प्रकाशित करीत असे ! पिताजी, सुखी आम्ही तेव्हां होतों, जेव्हां आपलें सर्व तेज विझवून पांडवांच्या गौरवाच्या छायेंत स्निग्धपणानें हेमन्तांतील बेडकांप्रमाणें जडत्वाच्या कूपांत आम्ही पडलेले होतों ! आज पांडुपुत्र पराभवाचें ओझें खांद्यावर घेऊन वनांत चालले आहेत. – आज मी सुखी नव्हे, आज मी जयी आहे.

**धृत०** – धिक्कार असो तुझ्या भ्रातृद्रोहाला ! पांडव आणि कौरव यांचे पितामह एक होते याचा तुला विसर पडला काय ?

**दुर्यो०** – तें तर विसरणें शक्य नाहीं. एक पितामह असूनहि धन, मान, तेज या बाबतींत आम्ही एक नाहीं. जर ते दूरचे कोणी परके असते तर क्षोभ झाला नसता. रात्रीचा चंद्र मध्यान्हींच्या सूर्याचा द्वेष करीत नाहीं. परन्तु प्रातःकाळीं एकाच पूर्व-उदयशिखरावर दोन भ्रातृसूर्य केव्हांहि राहणें शक्य नाहीं ! आज द्वंद्व नाहींसें झालें आहे – आज मी जयी, आज मी एकमेव !

**धृत०**– क्षुद्र ओीर्ष्या म्हणजे विषमयी भुजंगिनी !

**दुर्यो०**– क्षुद्र नव्हे, ओीर्ष्या महान् आहे. ओीर्ष्या हा बृहतांचा धर्म आहे. दोन वृक्ष आपल्यामध्यें अंतर राखतात; पण लाखों तृणें ओक-मेकांत मिसळून ओकमेकांना कवटाळून राहातात. असंख्य नक्षत्रें भ्रातृत्वाच्या बंधनांत बांधलेलीं असतात पण सूर्य ओकटा असतो, चन्द्र ओकटा असतो. दूर वनाच्या आड मलिन किरणांची पांडु-चन्द्रकोर आज अस्तास गेली. आज कुरुसूर्य ओकमेव आहे ! आज मी विजयी आहें.

**धृत०**– आज धर्म पराजित झाला आहे !

**दुर्यो०**– पिताजी, लोकधर्म आणि राजधर्म ओक नव्हेत. लोकसमाजांत बरोबरीचे लोक साहाय्यकारी सुहृद् बनून राहातात. परंतु राजा ओकेश्वर असतो. बरोबरीचा माणूस हा त्याचा महाशत्रु, चिरविघ्न, दुश्चिन्तेचें कारण, समोरील अडथळा, मागील भय, अहोरात्र यश–शक्ति–गौरवाचा क्षय करणारा आणि ऐश्वर्यांतील वांटा हिरावून घेणारा बनतो. दुर्बळ लोक बांधवांमध्यें बल विभागून घेऊन बलवान् राहा-तात; पण राजदंडाचे जितके खंड होतील तितकी ती








त्याची दुर्बलता बनते. तितका त्याचा क्षय होतो. राजा जर अेकटा आपलें मस्तक सर्वांपेक्षां उंच ठेवणार नाहीं, जर बहुजन खूप दुरून त्याचें समुद्धत शिर अव्याहतपणें, नित्य, स्थिर पाहूं शकले नाहींत तर बहुजनांवर खूप दूरपर्यन्त त्याची शासनदृष्टि कशी कायम राहील ? राजधर्मांत भ्रातृधर्म अथवा मित्रधर्म नसतो, फक्त जयधर्म असतो. महाराज,—म्हणून आज मी चरितार्थ झालों आहे. कारण आज मी जयी आहे. पांच शिखरांच्या पांडव-गौरवगिरीचा समोरील अडथळा आज कोसळला आहे !

**धृत०**— कपटद्यूतानें जिंकून तूं त्याला जय म्हणतोस ? अरे लज्जाहीन अहंकारी पुरुषा !

**दुर्यो०**— पिताजी, ज्याचें जें बळ तेंच त्याचें अस्त्र व युद्धांतील भांडवल. नख आणि दांत या बाबतीत वाघाशीं बरोबरी करणें शक्य नाहीं; म्हणून धनुष्यबाणानें त्याचे प्राण घेण्यांत कोणत्या माणसाला लाज वाटते ? मूढाप्रमाणें मृत्युमुखांत उडी घेऊन आत्मसमर्पण करणें हें कांहीं युद्ध नव्हे. युद्धाचें एकमात्र लक्ष्य म्हणजे जयलाभ. पिताजी आज मी जयी झालों आहे. म्हणून हा अहंकार !

**धृत ०**— आज तूं जयी झाला आहेस, म्हणून तुझ्या निंदाध्वनीनें अत्यंत धिक्कारपूर्वक आकाश आणि पृथ्वी भरून टाकिलीं आहेत !

**दुर्यो०** — निन्दा ! आतां मी तिला भीत नाहीं. निंदेचा गळा दाबून मी तिला नष्ट करीन. बडबडणाऱ्या नगरीची धृष्ट जीभ दृढ बळानें माझ्या पादपीठाखालीं दाबून मी तिला निःस्तब्ध बनवीन. ' दुर्योधन पापी आहे ', 'दुर्योधन क्रूर आहे', ' दुर्योधन हीन आहे ', असें इतके दिवस निमूटपणें ऐकत आलों. आतां हे महाराज, राजदंडाला स्पर्श करून मी असें सांगतों कीं आज सर्वांकडून मी असें वदवून घेईन कीं, " दुर्योधन राजा आहे, दुर्योधन राजनिंदेनें भरलेली टीका सहन करीत नसतो, दुर्योधन स्वतःच्या हातानें स्वतःचा यशोध्वज उंच फडकावितो ! "

**धृत०** — अरे वत्सा, ऐक. निंदेला जिभेवरून हांकून लावल्यास ती खालच्या मानेनें अंतराच्या गूढ अंधकारांत दूरदूरपर्यन्त आपलीं खोल जटिल मुळें पसरविते; आणि चित्ततलाला सदैव विषानें कडू बनवून ठेवते. जिभेवर नृत्य करून चपल चंचल निंदा थकून जाते. तिला गुप्त हृदय-दुर्गांत निःशब्दपणें आपली शक्ति वाढवूं देऊं नकोस; निंदारूपी सर्पदलाला प्रीतीच्या मंत्रबळानें शांत कर आणि हंसतमुखानें बांसरीच्या सुरांनीं तिला बंदी बनव.

**दुर्यो०** — अव्यक्त निंदा राजमर्यादेला कसलीहि क्षति करीत नाहीं. मी तिच्याकडे ढुंकूनहि पहात नाहीं. प्रेम न मिळालें तरी त्याचा मला खेद नाहीं. पण महाराज, मला उद्धटपणा चालणार नाहीं ! प्रेमदान स्वेच्छाधीन असतें. प्रेमाची भिक्षा दीनतम दीनहि देतो. तें प्रेम त्यांनीं पाळलेल्या मांजराला, दारांतील कुत्र्याला आणि पांडवबंधूंना खुशाल वांटून द्यावें— त्याच्याशीं मला कर्तव्य नाहीं. मला हवें भय ! तोच माझा राजभाग ! दर्पितांचा दर्प नष्ट करून मला जय हवा आहे. हे पितृदेव, माझें निवेदन ऐका. आतांपर्यन्त तुमचें सिंहासन माझ्या निंदक-दलानें नित्य घेरून टाकलेलें असे. कंटकतरूप्रमाणें निष्ठुर कुंपण रचून तुमच्या आणि माझ्यामध्यें त्यांनीं अंतर निर्माण केलें होतें. त्यांनीं तुम्हांला नेहमीं पांडवांचें गुणगान आणि आमची निंदा अैकविली आहे ! —— अशा प्रकारें हे पिताजी, आम्ही पितृस्नेहापासून सदैव वंचित राहिलों आहोंत. अशा प्रकारें पिताजी, आम्ही लहानपणापासून हीनबल राहिलों आहोंत. पितृस्नेहरूपी झऱ्याच्या मुखावर मोठी शिळा पडल्यामुळें आम्ही परिक्षीण शीर्ण नदीप्रमाणें नष्टप्राण, गतिशक्तिहीन झालों आहोंत; पदोपदीं पराभूत झालों आहोंत ! उलट, पांडव धष्टपुष्ट, अखंड आणि अबाधगति बनले आहेत. आजपासून पिताजी, सिंहासनाजवळून त्या निंदकांच्या दलाला— संजय, विदुर, भीष्मपितामह यांना— जर तुम्ही दूर करणार नसाल, जर ते शहाणपणाचा आव आणून हितकथा, धर्मकथा, सदुपदेश, निंदा, धिक्कार, तर्क वगैरेंनीं क्षणोक्षणीं राज्यकर्माचें सूत्र तोडून टाकणार असतील, माझ्या राजदंडाला भाराक्रांत करून टाकणार असतील, राजशक्तीमध्यें पदोपदीं द्विधाभाव निर्माण करणार असतील, अपमानानें आणि लाजेनें राजमुकुट मलिन करणार असतील, तर हे पितृदेव, मला क्षमा करा—— मला त्या सिंहासनरूपी कंटकशय्येची जरूर नाहीं. महाराज, मी पांडवांना राज्य देऊन त्याच्या बदलीं वनवास घेईन आणि दूर निघून जाईन !



अनुक्रमणिका






**धृत०** – हाय ! अभिमानी वत्सा, मित्रांचीं सुकठोर निंदावचनें अैकून माझा पितृस्नेह किंचित्‌हि कमी झाला असता तर कल्याण झालें असतें. माझ्या ठिकाणीं इतका अधिक स्नेह आहे कीं मीं अधर्मांत सहयोग दिलेला आहे. मी ज्ञान गमावून बसलों आहे. माझ्यामध्यें इतका स्नेह आहे कीं मी तुझा सर्वनाश करीत आहें. पुरातन कुरुवंशरूपी महारण्यांत मी घोर कालाग्नि पेटवीत आहें. – असें असतांहि पुत्रा, तूं मला स्नेह नाहीं म्हणून दोष देतोस ? तूं मणिलोभानें कालसर्पाची इच्छा धरलीस आणि मीं अंधानें स्वतः-च्या हातानें त्याची फणा धरून तुला तो दिला. आंतून आणि बाहेरून आंधळा बनलेला मी सदैव तुझ्यासाठीं प्रलयतिमिरांत चाललों आहे. मित्रगण हाहाकार करून निषेध करीत आहेत, सगळीं निशाचर गिधाडें अशुभ चीत्कार करीत आहेत, पदोपदीं मार्ग संकीर्ण होत आहे. जवळ येऊन ठेपलेल्या विपत्तीमुळें शरीरावर कांटा उभा राहिला आहे तरीहि भयंकर स्नेहानें तुला छातीशीं दृढ हातानें घट्ट धरून वायुबलानें, अंधवेगानें, मूढमत्त अट्टहास्य करीत उल्केच्या प्रकाशांत विनाशाच्या मुखांत मी धांवत चाललों आहे. केवळ तूं आणि मी, आणि दुसरा साथी वज्रहस्त दीप्त अन्तर्यामी ! समोरचें दिसत नाहीं. मागील निवारण नाहीं. फक्त निदारुण विनाशाचें घोर आकर्षण खालीं ओढीत आहे ! अचानक केव्हां तरी क्षणांत भान येअील, विधात्याची गदा क्षणांत शिरावर पडेल. अशीहि वेळ येअील ! तोंपर्यंन्त पितृस्नेहाविषयीं मनांत शंका आणूं नकोस, आलिंगन शिथिल करूं नकोस. तोंपर्यन्त तूं द्रुत-हस्तानें सर्व स्वार्थधन लूटून घे; जयी हो, सुखी हो, अेकेश्वर राजा हो ! – अरे तुम्ही जयवाद्य वाजवा ! आकाशांत जयध्वजा फडकवा. आज विजयोत्सवा-मध्यें न्याय, धर्म, बन्धु, मित्र कोणीहि राहाणार नाहीं, विदुर अथवा भीष्म राहाणार नाहींत, संजयहि राहाणार नाहीं, लोकनिंदा किंवा लोकलज्जा यांचें भय राहाणार नाहीं, कुरुवंशाची राजलक्ष्मीहि आतां राहाणार नाहीं. केवळ अन्धपिता, त्याचा अन्ध-पुत्र आणि कालान्तक यम हेच राहातील ! —केवळ पितृस्नेह आणि विधात्याचा शाप राहील ! अितर कोणीहि राहाणार नाहीं.

[ **चर** प्रवेश करतो ]

**चर** – महाराज, विप्रगण अग्निहोत्र आणि देव-उपासना यांचा त्याग करून, संध्यार्चना सोडून, पांडवांची प्रतीक्षा करीत चव्हाट्यावर उभे आहेत. कोणीहि नागरिक घरांत नाहीं, सगळीं दुकानें बन्द आहेत. संध्याकाळ झाली असूनहि हे प्रभो, भैरवमंदिरांत शंख-घंटा वाजत नाहींत अथवा संध्याभेरीहि निनादत नाहींत, किंवा दीपहि पाजळत नाहींत. सर्व शोकातुर नरनारी टोळयाटोळयांनीं दीनवेषांत आणि सजल-नयनांनीं नगराच्या सिंहद्वाराकडे जात आहेत.

**दुर्यो०** – त्यांना माहित नाहीं कीं दुर्योधन जागा झाला आहे. हे मूढ अभाग्यांनो, तुमचे दिवस आतां भरले. आज राजा आणि प्रजा यांच्यामध्यें घनिष्ठ कठिण परिचय होईल. प्रजेची ही धृष्टता – निर्विष सापाचें व्यर्थ फणा आपटणें, निःशस्त्र दर्पाचा हुंकार किती दिवस राहतो हें मी पाहातोंच !

[ **प्रतिहारी** प्रवेश करते ]

**प्रतिहारी** – महाराज, महिषी **गांधारी** आपल्या चरणीं दर्शनाची प्रार्थना करीत आहेत.

**धृत०** – मी त्यांचीच प्रतीक्षा करीत आहे.

**दुर्यो०** – पिताजी, तर मग मी चाललों !

[ जातो ]

**धृत०** – जा ! कर पलायन ! अरे पुण्यभीता ! साध्वी जननीची उगारलेल्या वज्रासारखी दृष्टि तूं कशी सहन करणार ? माझी तुला लाज वाटत नाहीं.

( **गांधारी प्रवेश करते** )

**गांधारी** – आपल्या श्रीचरणीं माझें निवेदन आहे. नाथ, एवढी विनंती मान्य करा.

**धृत०** – प्रियेची प्रार्थना कधीं अपूर्ण राहिली आहे काय ?

**गांधारी** – याच क्षणीं त्याग करा—

**धृत०** – कोणाचा, हे महिषी ?

**गांधारी** – ज्याच्या पापाच्या संघर्षानें धर्माच्या तलवारीला भयंकर धार लावली जात आहे त्या मूढाचा !

**धृत०** – कोण तो माणूस ? कोठें आहे ? त्याचें नांव सांग.

**गांधारी** – पुत्र दुर्योधन !










**धृत०** – त्याचा मी त्याग करूं!

**गांधारी** – आपल्या चरणीं हेंच निवेदन आहे.

**धृत०** – हे गांधारी, राजमाते, ही प्रार्थना दारुण आहे.

**गांधारी** – हे कौरवा, ही प्रार्थना फक्त माझीच आहे काय? हे नरनाथ, कुरुकुलाचे पितृपितामह स्वर्गातून अहर्निश ही प्रार्थना करीत आहेत. त्याग करा, त्याग करा त्याचा! – त्याच्या अत्याचारामुळें कौरवकल्याणलक्ष्मी रात्रंदिवस अश्रुमुखानें निरोप घेण्याच्या क्षणाची प्रतीक्षा करीत आहे.

**धृत०** – ज्यानें धर्माचें लंघन केलें आहे त्याला धर्म शासन करील— मी पिता—

**गांधारी** – आणि मी माता नाहीं का? मीं गर्भभारजर्जरित होऊन आपल्या जागृत हृत्पिंडाखालीं त्याचें ओझें वाहिलें नाहीं काय? त्याचें तें अकलंक शिशुमुख पाहून माझें स्नेहविगलित चित्त शुभ्र दुग्धधारेच्या रूपानें दोन्ही स्तनांतून उसळून वर आलें नव्हतें काय? शाखेला फळ चिकटलेलें असतें त्याप्रमाणें अनेक वर्षेपर्यन्त माझ्या हास्यांतून हास्य, वाणींतून वाणी, प्राणांतून प्राण ओढून घेत दोन इवल्याशा बाहुरूपी देठांनीं तो मला चिकटलेला नव्हता काय? तरीहि महाराज, त्याच पुत्र दुर्योधनाचा आज त्याग करा असें मी म्हणत आहे.

**धृत०**– त्याचा त्याग करून मी काय राखून ठेवूं?

**गांधारी** – आपला धर्म.

**धृत०** – धर्म तुला काय देणार?

**गांधारी** – नवनवीन दुःखें! अधर्माच्या मोबदल्यांत मिळविलेलें पुत्रसुख आणि राज्यसुख दोन कांट्यांप्रमाणें छातीशीं आवळून मी निरंतर कशी राहूं?

**धृत०** – हाय प्रिये, धर्मवश होऊन द्यूतबद्ध पांडवांचें हृतराज्यधन मी एकदां परत दिलें होतें. परन्तु दुसऱ्याच क्षणीं पितृस्नेह माझ्या कानांत शेंकडों वेळां गुंजन करूं लागला : "अरे, काय केलेंस हें? एकाच वेळीं धर्म आणि अधर्म या दोन होड्यांवर पाय ठेवून कोणी वांचत नाहीं. कुरुपुत्रगण एकदां पापाच्या प्रवाहांत उतरलेच आहेत; तर आतां धर्माशीं संधि करणें व्यर्थ आहे. पापाच्या दारीं पाप साह्य मागत आहे. हे हतभाग्या, वृद्धा, बुद्धिहता, दुर्बळ द्विधेंत पडून तूं हें काय केलेंस? राज्य परत देऊनहि पांडवांच्या मनांतील अपमानाची जखम पुनः भरून येणार नाहीं. अग्नीमध्यें केवळ नवीन काष्ठें टाकण्यासारखेंच आहे तें. अपमानिताच्या हातीं क्षमतेचें अस्त्र द्यावयाचें तें मरण्यासाठींच! सामर्थ्यवानाला अल्प पीडा देऊन सोडून देऊं नकोस; त्याचें दलनच कर. पापाबरोबर व्यर्थ खेळ करूं नकोस; त्याला बोलावून आणलें असशील तर त्याचा कायमचा स्वीकार कर." अशा प्रकारें पितृस्नेहरूपानें पापबुद्धि माझ्या कानांत गुपचुप कितीतरी गोष्टी तीक्ष्ण सुयीप्रमाणें भोसकूं लागली! मीं पुनः पांडवांना परत लावलें आहे. द्यूताच्या फसवणुकीनें मीं त्यांना दीर्घ वनवासांत धाडून दिलें. हाय धर्म! हाय रे प्रवृत्तिवेग! संसाराचें मर्म कोणाला कळणार?

**गांधारी**– महाराज, धर्म हा कांहीं संपत्तीचा हेतु नाहीं. तो सुखाचा क्षुद्र सेतुहि नाहीं. – धर्मांतच धर्माची परिसमाप्ति होते. स्वामी, मी मूढ नारी! धर्माची गोष्ट तुम्हांला काय सांगावी? तुम्ही तर सर्व जाणतांच. पांडव वनांत जातील. त्यांना परत फिरविण्याचा प्रयत्न केला तरीहि ते परतणार नाहींत. ते प्रतिज्ञेनें बांधलेले आहेत. आतां हें महाराज्य तुमचें एकट्याचें आहे. हे महीपति, या क्षणीं तुम्ही आपल्या मुलाचा त्याग करा. निष्पापाला दुःख देऊन स्वतः पूर्ण सुख भोगूं नका. न्यायधर्माला पौरवप्रासादांतून विमुख करूं नका–. हे धर्मराज, आजपासून सुदुःसह दुःख घ्या; तुम्ही उचलून घ्या आणि माझ्याहि शिरावर उचलून द्या!

**धृत०**– हाय महाराज्ञी, तुझा उपदेश सत्य आहे, तुझी वाणी तीव्र आहे.

**गांधारी**– अधर्माचें मधानें माखलेलें विषफळ उचलून घेऊन पुत्र आनंदानें नाचत आहे. स्नेहमोहानें भुलून त्याला तें फळ खाऊं देऊं नका; काढून घ्या, फेंकून द्या, रडूं द्या त्याला. फसवणुकीनें मिळालेल्या, पापानें नष्ट झालेल्या राज्याचा, धनाचा आणि जनाचा त्याग करून त्याला स्वतःलाहि निर्वासित होवूं द्या! – वंचित पांडवांचा समदुःखभार त्यालाहि वहन करूं द्या.








धृत० – धर्माचें विधान विधात्याच्या हातीं ! तो जागृत आहे. त्याचा धर्मदंड नित्य उद्यत असतो. हे मनस्विनी, त्याच्या राज्यांत त्याचें कार्य तो करील. मी पिता आहे. —

गांधारी – तुम्ही राजा आहांत ! हे राजाधिराज, विधात्याचा वामहस्त आहांत. धर्मरक्षणाचें कार्य तुमच्यावर सोंपविलेलें आहे. मी तुम्हांला विचारत्यें, जर तुमचा कोणी प्रजाजन सती अबलेला परगृहांतून ओढून आणून तिचा दोष नसतांना तिचा अपमान करील तर तुम्ही त्याला काय शिक्षा कराल ?

धृत० – हद्दपारी !

गांधारी – तर मग समस्त स्त्रियांच्या वतीनें डोळयांत अश्रू आणून मी आपल्या–राजाच्या–चरणीं न्यायाची मागणी करीत आहे. हे प्रभो, पुत्र दुर्योधन अपराधी आहे. हे राजन्, तुम्ही स्वतःच साक्षी आहांत. पुरुषां–पुरुषांमध्यें स्वार्थापायीं अहोरात्र भांडण चालूच असतें – त्याचा बरेंवाईटपणा मला कळत नाहीं. दंडनीति, भेदनीति, कूटनीति अशा पुरुषांच्या शेंकडों रीती पुरुषच जाणोत ! बळाविरुद्ध बळ, कपटाविरुद्ध कपट, डावपेंचांवर कित्येक डावपेंच आघात करीत असतात ! आम्ही तर आमच्या घरकामांत, शान्त अंतःपुरांत या सर्वांपासून दूर राहतों. पण त्या ठिकाणीं जो पुरुष विद्वेष–अग्नि ओढून आणतो, बाहेरच्या झगडयांतून ओर्ष्येचें गरळ तेथें आणून टाकतो, पुरुषांना सोडून अन्तःपुरांत प्रवेश करून गृहधर्मचारिणी असहाय नारीच्या पवित्र देहावर पापी कठोर स्पर्शानें असन्मानपूर्वक हात टाकतो, पतीशीं विरोध करून जो पुरुष त्याच्या पत्नीवर आघात करून त्याचा सूड घेतो – तो केवळ पाखंडी नव्हे, तो भ्याड आहे ! महाराज, त्याला काय शिक्षा ? निष्पाप पुरुवंशांत पाप जन्माला आलें तर तेंहि सहन करितां येईल. परंतु हे प्रभो, मातृगर्वाच्या जोरावर मी असें समजत होतें कीं माझ्या गर्भांतून वीरपुत्र जन्मले आहेत ! — हाय नाथ, त्या दिवशीं जेव्हां अनाथ पांचालीच्या आर्त कंठस्वरानें लज्जा, घृणा आणि करुणा यांच्या उष्णतेनें प्रासादाच्या पाषाणांच्या भिंतींना वितळवून टाकलें, तेंव्हां मी खिडकीपाशीं धांवत जाऊन पाहिलें तों तिचें वस्त्र ओढून सभेमध्यें गांधारीचीं पुत्रपिशाच्चें खदखदां हंसत होतीं ! धर्माला माहित आहे कीं त्या दिवशीं माता या नात्यानें माझा उरला – सुरला गर्व कायमचा चक्काचूर होऊन गेला ! हे कुरुराजगजा ! भारताला सोडून पौरुष कोठें निघून गेलें ? हे महारथी, तुम्ही जडमूर्तींप्रमाणें तेथें एकमेकांच्या तोंडांकडे पाहात राहिलां. कोणी हंसले ! कोणी जिज्ञासेनें कुजबुजले ! गर्जनारहित लुप्त विद्युल्लतेप्रमाणें निश्चल तलवारी म्यानांत झोंपल्या होत्या. महाराज ! महाराज ! ऐका ही विनंति ! जननीची लाज दूर करा, वीरधर्माचा उद्धार करा, पदाहत सतीचें क्रंदन थांबवा, अवनत न्यायधर्माचा सन्मान करा – दुर्योधनाचा त्याग करा !

धृत० – हे महिषी, परितापाच्या दाहानें जर्जर झालेल्या हृदयावर तूं केवळ निष्फळ आघात करीत आहेस.

गांधारी – हे नाथ, मला शेंकडोंपट वेदना होत नाहींत काय ? हे प्रभो, दंडिताबरोबर जेव्हां दंडदाता समान आघातानें रडतो तेव्हां तो सर्वश्रेष्ठ न्याय असतो. ज्याच्यासाठीं जिवाला कसलीहि व्यथा होत नाहीं त्याला दंड देणें हा प्रबळाचा अत्याचार होय. तुम्हीं पुत्राला जी दंडवेदना देऊं शकत नाहीं, ती कोणालाहि देऊं नका. जो तुमचा पुत्र नाहीं, त्यालाहि पिता असतो. हे न्यायाधीशा, त्याच्यासमोर तुम्ही अपराधी ठराल. मीं असें ऐकलें आहे कीं आपण सर्वच विश्वविधात्याचीं संतानें आहोंत. – तो नारायण आपल्या स्वतःच्या हातांनीं पुत्रांचा निवाडा करतो; व्यथा देतो, त्याच बरोबर स्वतःहि व्यथा अनुभवतो. नाहींतर न्याय देण्याचा त्याला अधिकारच राहिला नसता. मी तर मूढ नारी आहे. मला माझ्या अंतरात्म्यांतून हेंच शास्त्र मिळालें आहे. हे महाराज, तुम्ही पापी पुत्राला अविचारानें क्षमा कराल तर आजपर्यंत तुम्ही असंख्य अपराधी लोकांना धर्मराज या नात्यानें कर्तव्य म्हणून जी कांहीं शिक्षा दिली असेल ती परत येऊन दंड देणाऱ्या राजाला लागेल ! तुमचा न्यायनिर्णय निर्ममतारूपानें पाप बनून तुम्हांला डागळील ! पापी – दुर्योधनाचा त्याग करा !

धृत० – प्रिये, आवर, आवर ही तुझी वाणी. मी मोहपाश तोडूं शकत नाहीं. धर्मकथा केवळ पुनः








पुनः येऊन व्यर्थ कठोर व्यथा देत आहेत. पापी पुत्र विधात्याला त्याज्य आहे म्हणून मी त्याचा त्याग करूं शकत नाहीं.– त्याचा मीच एक आहे. ज्या पुत्रानें उन्मत्त लाटांवर स्वतःचें शरीर लोटून दिलें आहे त्याला सोडून मला कसें जाववेल ? त्याच्या उद्धाराची आशा मीं सोडून दिली तरी त्याला मीं प्राणपणानें छातीशीं कवटाळून धरावें, त्याच्याच बरोबर एका पापांत उडी घ्यावी, एकाच विनाशाच्या तळाशीं बेधडकपणें बुडून मरावें, त्याच्या दुर्गतींतील वांटा घ्यावा, त्याच्या दुर्मतीचें अर्धें फळ मीं भोगावें हेंच तर माझें सांत्वन आहे ! आतां कांहीं न्याय-विचार करण्याला वेळ नाहीं; कांहीं उपाय नाहीं, मार्ग नाहीं. घडावयाचें होतें तें घडलें आहे. त्याचें जें कांहीं फळ व्हावयाचें असेल तें होईल ! [ प्रस्थान ]

**गांधारी**– हे माझ्या अशान्त हृदया, तूं शांत हो. विधात्याच्या न्यायाची नतमस्तक होऊन धीरानें प्रतीक्षा करीत राहा. सुदीर्घ रात्रीनंतर ज्या दिवशीं काळ एका-एकीं जागा होतो आणि आपल्या चुका दुरुस्त करतो तो दिवस दारुण दुःखाचा होय. ज्याप्रमाणें दुःसह उत्तापानें स्थिर, गतिहीन बनलेला वायु झोंपीं जातो आणि अकस्मात् वावटळीच्या रूपानें जागा होऊन आपल्या जडतेवर आक्रमण करतो, आंधळया विंचवा-सारखा भयंकर शेपटीनें स्वतःच्याच शिरावर दीत वज्रशूलाप्रमाणें अविरतपणें आघात करूं लागतो, त्याप्रमाणें काळ जेव्हां जागा होतो तेव्हां भीतीनें सर्वजण त्याला अकाल म्हणतात. हे रमणी, तूं आपलें मस्तक नमव, नमव आणि त्या महा-काळाला प्रणाम कर. त्याच्या रथचक्राचा ध्वनि दूर रुद्रलोकांतून वज्रासारखा घर्घरनाद करीत असलेला हा ऐकूं येत आहे. तुझें आर्तजर्जर हृदय त्याच्या मार्गावर पसरवून ठेव. मूक-पणें निर्निमेष नेत्रांनीं छिन्नसिक्त हृत्पिंडांच्या रक्तशतदलांनीं ओंजळ भरून तूं जागत राहा. त्यानंतर जेव्हां गगनांत धूळ उडेल, धरणी थरथरां कांपेल, आकाशांत अकस्मात् क्रंदन-ध्वनि उठेल, तेव्हां हाय हाय ! हे रमणी, हे अनाथिनी ! हाय हाय ! हे वीरवधू, हाय गे वीरमाते, त्या हाहाकारामध्यें तूं धीर धरून अवनत शिरानें डोळे मिटून धुळींत लोटांगण घाल. त्यानंतर, नमोनमः सुनिश्चित परिणाम ! निर्वाक्, निर्मम दारुण, करुण शांतीला नमस्कार असो ! नमस्कार असो कल्याण-कठोर-कान्त स्वरूपाला, स्निग्धतम क्षमेला ! विद्वेषाच्या भीषण परिणामाला नमस्कार असो ! स्मशानाच्या भस्मचर्चित परम निष्कृतीला नमस्कार असो !

[ दुर्योधनमहिषी भानुमतीचा प्रवेश ]

**भानुमती** – ( दासींना उद्देशून ) विदुमुखी, परभृते, माल्यवस्त्रें, अलंकार डोकीवर उचलून घ्या.

**गांधारी** – मुली, जरा धीरे ! पौरवभवनांत आज कसला महोत्सव आहे ? नवीन वस्त्रालंकारांनीं सजून हे माझ्या सुने, तूं कोठें चालली आहेस ?

**भानु०** – शत्रुपराभवाचा शुभक्षण येऊन ठेपला आहे.

**गांधारी** – आत्मीय स्वजन ज्याचे शत्रू होतात त्याला त्याचा आत्मा हाच नित्यशत्रु बनतो. धर्म त्याचा शत्रु बनतो. त्याचा शत्रु अजेय असतो.— हे कल्याणी, हे नवीन अलंकार कोठून आणलेस ?

**भानु०** – स्वतःच्या बाहुबळानें वसुमतीला जिंकून पांचाळीला तिच्या पांच पतींनीं जे रत्न अलंकार आणून दिले होते, ( राजसूय ) यज्ञाच्या दिवशीं जे परिधान केल्यानें द्रौपदीच्या अंगांतून रत्नकिरणांच्या शेंकडों सुयांच्या मुखांनीं भाग्य-अहंकार झळकत होता आणि जो कुरुकुलकामिनीच्या हृदयाला घरें पाडीत होता – त्या रत्नभूषणांनीं मला सजवून तिला वनांत जावें लागलें.

**गांधारी** – हाय गे मूढे, तरीहि तुला धडा मिळाला नाहीं ? त्या रत्नांवरून तुला इतका अहंकार ! कसली ही भयंकर क्रांति ! प्रलयाचा शृंगार हा ! युगांतींच्या उल्केप्रमाणें हीं रत्नांचीं नूपुरें आज तुला जाळीत नाहींत काय ? ही रत्नललाटिका तर तुझ्या सौभाग्याची वज्रानलशिखा आहे. तुला पाहून माझ्या अंगावर भीतीनें कांटा उभा राहात आहे; माझ्या चित्तांत क्रंदन सुरूं झालें आहे –. तुझे अलंकार माझ्या आशंकित कानांत उन्मादिनी शंकरीचा तांडवझंकार जागृत करीत आहेत.

**भानु०** – माते, आम्ही क्षत्रियनारी आहोंत; दुर्भाग्याला आम्ही भीत नसतों. कधीं जय, कधीं







पराजय ! – कधीं मध्याह्नगगनीं तर कधीं अस्ताचलीं, क्षत्रियमहिमासूर्य कधीं वर चढतो तर कधीं खालीं उतरतो ! हे माते, आम्ही क्षत्रियवीरांगना ही गोष्ट लक्षांत ठेवून भीतीच्या पोटांत राहूनहि क्षणभर देखील संकटाला भीत नसतों. दुर्दिन-दुर्योग आले तरी त्यावेळीं विमुख भाग्यावर उपहासाचा प्रहार करून कसें मरावयाचें तेंहि आम्हांला कळतें आणि देवि, कसें जगावयाचें तेंहि आपल्या श्रीचरणांची सेवा करून मीं शिकून घेतलें आहे.

**गांधारी** – मुली, अमंगल कांहीं तुझें एकटीचें नाहीं. अमंगल जेव्हां आपल्या लवाजम्यासह आपली भूक भागवितें तेव्हां हाहाकार माजतो, कितीतरी वीरांच्या रक्तप्रवाहांत कित्येक विधवांच्या अश्रुधारा येऊन पडतात. आम्रलताकुंजवनांतील मंजरी झंझावातानें जमीनदोस्त व्हाव्यांत त्याप्रमाणें वधूंच्या हातांतील शेंकडों रत्न-अलंकार गळून पडतात. वत्से, बांधलेला सेतु मोडूं नकोस. गंमत म्हणून घरामध्यें विद्रोहाचें निशाण उभारूं नकोस. आज आनंदाचा दिवस नव्हे. माते ! स्वजन-दुर्भाग्याच्या वेळीं सर्वांग सजवून तूं गर्व करूं नकोस. आजपासून संयमपूर्वक शुद्ध-चित्तानें तूं उपवासव्रताचें आचरण कर.–वेणी सोडून, मुली, तूं शांत मनानें देवतार्चन कर. या पाप-सौभाग्याच्या दिवशीं गर्वानें आणि अहंकारानें प्रतिक्षणीं विधात्याला लज्जित करूं नकोस. काढून टाक ते अलंकार आणि तें नवें रक्तांबर ! थांबव तीं उत्सववाद्यें आणि राज-आडंबर ! बाळे, यज्ञगृहांत जा, पुरोहिताला बोलाव. शुद्धसत्त्वचित्तानें काळाची प्रतीक्षा कर.

[ द्रौपदीसह पंचपांडवांचा प्रवेश ]

**युधिष्ठिर** – हे जननी, निरोपाच्या वेळचा आशीर्वाद मागण्यासाठीं आलों आहोंत.

**गांधारी** – हे वत्सांनों, सौभाग्याचा दिनमणि दुःखरात्रीच्या अवसानानंतर द्विगुणित होऊन उगवेल. हे माझ्या दुःखव्रती पुत्रांनों, तुम्ही वायूपासून बळ, सूर्यापासून तेज, पृथ्वीपासून धैर्य आणि क्षमा मिळवा. दैन्यामध्यें दीन छद्मरूपानें लक्ष्मी सदा गुप्त राहून तुमच्या मागोमाग फिरत राहो, आणि तुमच्यासाठीं दुःखांतून अक्षय संपत्तीचा संचय करो. तुमचा वनवास नेहमीं निर्भय होवो. पापाविना येऊन पडलेला हा दुःखभोग तुमच्या अंतःकरणांत वह्निशिखेंतून तावूनसुलाखून निघालेल्या दीप्त सुवर्णाप्रमाणें ज्वलंत तेज निर्माण करो. हें महादुःखच तुम्हांला महान् साहाय्यरूप होवो. या दुःखामुळें धर्मराज विधाता तुमचा ऋणी राहील. आणि जेव्हां तो आपल्या हातांनीं आत्मऋण फेडील तेव्हां जगामध्यें देव अथवा मानव यांच्यापैकीं कोण तुमच्या मार्गांत उभें राहील ? हे पुत्राधिक पुत्रांनो, माझ्या मुलानें जितके कांहीं अपराध केले आहेत त्या सर्वांचें माझे आशीर्वाद खंडन करोत, अन्यायपीडन गंभीर कल्याणसिन्धूचें मंथन करो !

[ द्रौपदीला आलिंगन देऊन ]

धुळींत लोळणाऱ्या सुवर्णलते, माझ्या मुली, माझ्या राहुग्रस्त चन्द्रलेखे, एकदां मस्तक वर उचल. माझें बोलणें ऐक. ज्यानें तुझा अपमान केला आहे त्याचाच अपमान जगतांत कायम राहील; त्याचा कलंक अक्षय राहील. कापुरुषत्वाच्या हातून झालेली सतीची लाछना–तुझ्या अपमानाची रास या जगांतील सर्व कुलांगनांनीं वांटून घेतली आहे ! जा बाळे, पतीबरोबर अमलिन मुखानें जा. अरण्याला स्वर्ग बनव; दुःखाला सुख बनव. माझ्या सुने, पतिदुःखाची सुदुःसह व्यथा हृदयांत धारण करून सतीत्वाची सार्थकता मिळव. राजभवनांत रात्रंदिवस हजारों सुखांची सामग्री असते ! — पण वनांत तूं एकटीच सर्वसुख, सर्वसंग, सर्वऐश्वर्य, सर्व सांत्वन, सर्व आश्रय क्लान्तींतील विश्राम आणि शान्ति, व्याधींतील शुश्रूषा, दुर्दिनांतील शुभलक्ष्मी, तमोमयी रात्रीचें आभूषण अशी मूर्तिमती उषा बनून राहा. तूं एकटी सर्वप्रीति, सर्वसेवा, जननी, गृहिणी बनून सतीत्वाच्या श्वेतपद्माप्रमाणें शतदलांनीं प्रस्फुटित होऊन संपूर्ण सौरभानें गौरवपूर्वक जागी राहा !

पुस्तक-परिचय : श्री. पु. ह पटवर्धन

# सामाजिक क्रान्ति घडवून आणणारा संत

पांच वर्षांपूर्वी विनोबाजींच्या विभूतिमत्त्वाची किती थोड्यांना कल्पना होती! गांधींच्या परिवारांतील एक अवलिया एवढीच त्यांची ख्याति होती. बाहेरच्या जगाला तर ते अगदींच अपरिचित होते. पण त्यांनीं आरंभिलेल्या भूदानयज्ञानें साऱ्या जगाचें लक्ष आकृष्ट केलें आहे. चीन, जपान, स्वीडन, चिली, अमेरिका, इंग्लंड वगैरे दूरदूरच्या देशांतील बुद्धिवंत, समाज-क्रांतीचे उपासक किंवा भाविक सज्जन स्त्रीपुरुष भूदान-पदयात्रेनें मोहित होऊन जिज्ञासेनें भारतांत येत आहेत. विनोबाजींच्या पदयात्रेमध्यें परदेशांतून मुद्दाम आलेलीं चारदोन माणसें तरी नेहमींच आढळतात.

विनोबांचें हें आंदोलन दान मागण्यासाठीं किंवा भूतृष्णा तृत करण्यासाठीं नाहीं. हें एक धर्मचक्र-प्रवर्तन म्हणजे महान् क्रांतिकार्य आहे. मानवाचें मन व अंतःकरण आमूलाग्र बदलावें, नवीन जीवनमूल्यें निर्माण व्हावींत, नवा समाज अस्तित्वांत यावा म्हणून ही धडपड आहे. "We do not aim at doing acts of kindness but at creating a kingdom of kindness" असें विनोबाजींनीं एका विदेशी वृत्तपत्रप्रतिनिधीला सांगितलें. समता, बंधुभाव, सहकार्य यांवर आधारलेला शासनमुक्त मानवसमाज जगांत निर्माण करणें हें या आंदोलनाचें उद्दिष्ट आहे.

भूदान – आंदोलनांतील हें काव्य विचारवंतांना प्रतीत होऊं लागलें आहे. विनोबाजींचें संतचरित व त्यांनीं आरंभिलेलें भूदान – आंदोलन या दोहोंचा देशोदेशीं आस्थेनें विचार होऊं लागला आहे. अनेक देशांत विनोबाजींसंबंधीं जे लेख व पुस्तकें प्रसिद्ध होऊं लागलीं आहेत त्यांमध्यें हॅलाम टेनिसन यांनीं विनोबाजींच्या पदयात्रेवर लिहिलेलें 'Saint of the March' हें पुस्तक विशेष उल्लेखनीय होय. टेनिसन व त्यांच्या पत्नी १९४६ मध्यें म. गांधींना भेटण्यासाठीं भारतांत आले होते. सेवाग्राममध्यें जाऊन त्यांनीं गांधींची मुलाखत घेतली होती. त्यांच्या या थोर शिष्याला भेटण्यासाठीं ते पवनारलाहि गेले होते. पण थोडा उशीर झाल्यामुळें त्यांना विनोबाजींची भेट घडली नाहीं. पुन्हां १९५४ मध्यें ते दोघे भारतांत आले व कांहीं दिवस विनोबाजींच्या भूदान-यात्रेचा त्यांनीं प्रत्यक्ष अनुभव घेतला. भूदान – पदयात्रेचीच या पुस्तकांत प्रामुख्यानें चर्चा आहे. विनोबाजींचें विभूतिमत्त्व लेखकाला प्रतीत झालें आहे यांत शंकाच नाहीं. टेनिसन यांचे लिखाण प्रवासवर्णनासारखें उथळ किंवा वरवरचें नाहीं; किंवा वृथा गंभीर व क्लिष्टहि नाहीं. त्यांची लेखणी सराइताची आहे. शैली सुबोध आहे. परदेशांतील वाचकाला विनोबाजी व भूदानआंदोलन यांची योग्य ओळख पटवून देणारें हें पुस्तक आहे. लेखकाची नम्रता, नेकी व शैली वाखाणण्यासारखी आहे. भारतीय वाचकाला टेनिसन यांच्या पुस्तकांत नवीन असें विशेष कांहीं आढळलें नाहीं तरी तें पुस्तक कंटाळवाणें खासच वाटणार नाहीं.

टेनिसन यांनीं विनोबाजींचा जीवनवृत्तांत पुस्तकाच्या शेवटीं चौदाव्या प्रकरणांत संक्षेपानें दिला आहे. बायबलमधलें "Whence Hath this Man ...?" ('हा कोण संप्रति नवा?') असें शीर्षक या प्रकरणाला त्यांनीं दिलें आहे. पुस्तकाच्या आरंभीं १९४६ सालीं सेवाग्राम – आश्रमाला लेखकानें दिलेल्या भेटीचें वर्णन आहे. गांधीजींची भेट घेऊन त्यांच्या या थोर शिष्याच्या भेटीसाठीं ते पवनारला गेले. पण तेथें पोहोंचण्यास थोडा उशीर झाल्यामुळें विनोबाजींच्या शिष्यांनीं बाहेरूनच त्यांची बोळवण केली. पुस्तकांत डोकें खुपसून बसलेल्या विनोबाजींचें खोलीच्या दाराबाहेरून त्यांना ओझरतें दर्शन झालें तेवढेंच. त्या दिवशीं रात्रीं लिहिलेली आपली दैनंदिनी लेखकानें

1. 'Saint on the March: Vinoba's Revolution by Love' – Hallam Tennyson. (Victor Gallancz. London.) pp. 223, 13-6/. Shillings.








पहिल्याच पानावर उद्धृत केली आहे. ते लिहितात : " विभूतिमत्त्व वडिलार्जित किंवा आनुवंशिक नसतें. थोर पुरुष आपल्या विभूतिमत्त्वाची छाप समाजावर पाडतात. पण त्यांच्या मागें ? घड्याळाची स्प्रिंग तुटावी अशी थोरांनीं निर्माण केलेली परंपरा त्यांच्या पाठोपाठच बंद पडते. गांधींचे शिष्य त्यांच्यामागें निष्प्रभ ठरतील. आश्रमाला मठाचें स्वरूप येईल. गांधीसारख्या संताला वारस नसतो. "

" विनोबाजींची व आमची त्या दिवशीं गांठ पडली असती तरी मी निराळें कांहीं लिहिलें असतें असें मला वाटत नाहीं. कॅलिफोर्नियापेक्षांहि भारतांत अव-लियांची संख्या फार मोठी आहे. एक साक्षात्कारी महात्मा असला तर शंभर भोळे-खुळे, विक्षिप्त आणि अचरट शिष्य त्याच्याभोंवती घोटाळत असतात. ' The lunatic fringe is a necessary background to the occasional religious genius who emerges from it' अर्धवट आणि अजागळ शिष्यांची पार्श्वभूमि महा-त्म्यांच्या मागें सदाच असते. त्या दिवशीं तरी विनो-बांना आम्ही याच मालिकेंत बसवलें असतें. "

" आठ वर्षांनीं आम्ही पुन्हां भारतांत आलों. भूदान-यज्ञ म्हणजे काय हें समजून घ्यायला आम्ही आतुर झालों होतों. गेल्या वर्षी म्हणजे १९५४ च्या मे महिन्यांत उन्हाळ्याच्या भर मोसमांत आम्ही बिहारला गेलों. तीन वर्षांत विनोबांना तीस लाखांहून अधिक एकर जमीन मिळालेली होती. पोटांत अल्सर झालेलें, मलेरियाचा ताप जडलेला, प्रकृति इतकी अशक्त–तरी हा पुरुष सरासरी दहा मैलांप्रमाणें मजल-दरमजल करीत रोज पदयात्रा करतो आहे. ऊन असो कीं पाऊस ! त्याच्या यात्रेंत खंड पडत नाहीं. हजारों लोक त्याचा संदेश ऐकायला रोज जमा होत आहेत. अखंड वाहाणाऱ्या वाऱ्याप्रमाणें त्याचें ' भूदान-आरो-हण ' सुरूं आहे. त्यांची वाणी गंगेच्या प्रवाहाप्रमाणें सारखी वाहाती आहे. लाखों ग्रामीण स्त्रीपुरुष त्या वाणीनें प्रभावित होत आहेत, पावन होत आहेत. पहांटेच्या सव्वातीन वाजल्यापासून रात्रीं नऊ-साडेनऊ वाजेपर्यंत हा पुरुष अविरत कार्यमग्न असतो. लोकांचा घोळका त्याच्याभोंवतीं सतत भणभणत असतो. पण त्याला त्याची दखलहि नसते. ' लोकान्नोद्विजते च यः ' या गीतेंतील वर्णनाचें प्रत्यक्ष उदाहरण येथें दिसतें. या माणसाची शांति कधीं ढळलेली दिसत नाहीं. त्याच्या पाठीचा कणा नेहमीं ताठ असतो. डोळे तेजानें चमकत असतात. इतका साधा वेष आणि वातावरण पण त्यांत केवढी आत्म-निष्ठा व सहजसौंदर्य आहे ! ' Under those few square feet of canvas, faith and serenity could be felt like a field of electric force ' ( ' विद्युत्-स्फुरणाप्रमाणें शांति व आस्तिक्य यांचे किरण त्या मंडपांतून सर्व भर पसरत होते ' ) ! "

स्वातंत्र्योत्तर काळांतील पहिल्या दोन वर्षांतील अडचणींचें लेखकानें वर्णन केलें आहे. म. गांधींच्या-सारखा धुरंधर व प्रभावी नेता असहाय झाल्यासारखा दिसूं लागला होता. जनतेमधील श्रद्धा झपाट्यानें नाहींशी होऊं लागली होती. श्रद्धेशिवाय पुनर्निर्माण कसें होणार ? जात, प्रांत कीं राष्ट्रीयता, ग्रामोद्योग कीं मोठे धंदे, सत्तेचें केंद्रीकरण कीं विकेंद्रित ग्रामव्यवस्था अशी नेत्यांची व अनुयायांची द्विधा मनोवृत्ति झालेली आहे, निश्चित श्रद्धा कशावरच नाहीं,– या मनःस्थितींत नव-समाज-निर्मिति कशी होणार ? सर्वच लोकशाहीचा तोंडानें जप करीत असले तरी मनोमनीं कोणी तरी कडक सत्ताधारी अधिकारा-पन्न व्हावा अशी लोकांची मनीषा आहे. नागरि-कांची अंतःकरणप्रवृत्ति हेंच लोकशाहीचें खरें अधिष्ठान असतें. तीच जर इतकी साशंक व डळमळीत झाली तर लोकशाही टिकणार कशी ?

पं. नेहरू लोकतंत्र राज्याचा मोठ्या शर्थीनें संभाळ करीत असले तरी ही आंतरिक उणीव भरून काढण्यास ते असमर्थ होते. रचनात्मक कार्य करणारे थोर गांधी-वादी नेते निष्प्रभ होऊन बसले होते. सर्वोदय-समाज स्थापन करण्यांत आला होता पण त्यांत प्राण ओतण्या-चें कोणामध्यें सामर्थ्य उरलें नव्हतें. शिवरामपल्ली येथें भरणाऱ्या संमेलनाला बळजोरी केली म्हणून विनोबांना जाणें भाग पडलें. नाहींतर ते जाते ना ! टेनिसन आपल्या पुस्तकांत म्हणतो : "त्यांच्यावर नेतृत्व लादलें गेलें. परिस्थितीनें त्यांना उजेडांत आणलें. ' चराति चरतो भगः ' अशी स्थिति दैवानें त्यांच्यावर लादली. पण म्हणूनच त्यांचें तेज इतकें चमकतें आहे. अगदीं








शंभर-नंबरी नाणें आहे. म्हणूनच वयाला ५६ वर्षें झालीं तरी हा माणूस जाणूनबुजून अज्ञात अवस्थेंत राहिला. जनसंपर्क यानें बुद्धि पुरःसर टाळला. आंबा पिकला कीं, त्याची कांति व सुवास जसा दरवळतो तसें या पुरुषाचें व्यक्तित्व अत्यंत विकसित झाल्या-नंतरच त्याची चाहूल लागली आहे."

तेलंगणामधील पदयात्रेंत 'अब तो बात फैल गयीं' असें त्यांचें थोरपण स्पष्ट झालें. ('The man and the occasion drew gradually closer.') पोचमपल्लीमध्यें चमत्कार घडला. "प्रत्येक जमीनदार रामचंद्र रेड्डीप्रमाणें स्वयंस्फूर्तीनें दान येईल तर पृथ्वीवर रामराज्य अवतरलेलें दिसेल" असें विनोबा आनंदानें म्हणाले. तेलंगणामध्यें पदयात्रेच्या प्रारंभींच त्यांना बारा हजार एकर जमीन मिळाली. म्हणजे रोज सरासरी २४० एकर जमीन भूदान म्हणून जमा झाली."

"भारतासारख्या खंडतुल्य देशांत लोकशाही दृढमूल व्हावयाची असेल तर भूदानक्रांति सफल झालीच पाहिजे. खरी ग्रामव्यवस्था त्याशिवाय अशक्य-प्राय आहे. जनतेचीं मनें व अंतःकरणें पालटण्याचें हें एक साधन आहे. जनता साक्षर झाली, नवीं समाजमूल्यें प्रस्थापित झाली, सहकार्य वाढलें तरच लोकशाहीला कांहीं आशा आहे" असें विनोबाजी वारंवार सांगतात. हा एक अत्यंत व्यवहार्य कार्यक्रम आहे. "दारिद्र्य व अभाव यांचें हें वांटप नसून हा दारिद्र्यमुक्तीचा सामुदायिक यत्न आहे."

बिहारच्या पदयात्रेंत देवघर येथील मंदिरांत प्रवेश करीत असतांना देवळाच्या पंड्यांनीं विनोबाजींच्या अनुयायांवर जो अमानुष हल्ला केला त्याचें लेखकानें वर्णन केलें आहे. विनोबाजींनाहि त्यांत थोडा मार लागला होता. पण त्यामुळें त्यांना एका कानानें कमी ऐकूं येऊं लागलें आहे, असें लेखकानें म्हटलें आहे. तें बरोबर नाहीं. विनोबांच्या कमी ऐकूं येण्याशीं देवघरच्या मारामारीचा कांहीं संबंध नाहीं.

गयेमध्यें भूदानकार्यकर्त्यांच्या एका सभेंत विनोबाजींनीं दोन तास भाषण केलें, त्याचें वर्णन करतांना लेखक म्हणतो : ("He spoke for close on two hours. He was quiet as ever. But his very lucidity and calm hid the dynamite of controlled passion.") 'दोन तास ते बोलले. नेहमीप्रमाणें ते शांत होते. त्यांच्या अंतर्यामीं धगधगत असलेल्या अग्नीचे स्फुलिंग त्यांच्या शांत व सुबोध वाणींत स्पष्टपणें तरंगत होते.'

विनोबाजींचें भाषण ऐकत असलेला प्रचंड जन-समुदाय पाहून लेखकाला भारतीय संस्कृतीचें दर्शन झालें. तो म्हणतो : "हजारों वर्षांचें दैन्य, दारिद्र्य, दास्य भोगूनहि हीं माणसें अजून किती सहृदय आणि संस्कारी आहेत! ('After thousands of years of poverty, a culture still lives and is capable of response, unique and vital, to the challenge of the modern world.')"

विनोबाजींच्या परिवारांतील स्त्रीपुरुषांचें व संघटनेच्या अभावामुळें पदोपदीं होणाऱ्या गोंधळ-गडबडीचें लेखकानें सहृदयतेनें ('an odd mixture of faith, fervour and in-competence') असें मार्मिक व मनोरंजक वर्णन केलें आहे.

विनोबांचें मोठेपण गांधींपेक्षां निराळें आहे. त्यांची कार्यपद्धति अलग आहे. लेखक म्हणतो : "त्यांच्या सांनिध्यांत मला कधीं संकोच नाहीं वाटला. त्यांच्या-मध्यें माथेफिरू आग्रह नाहीं. त्यांचें व्यक्तिमत्त्व अनाक्रमक आहे. ते जेव्हां एकादी गोष्ट समजावून देतात तेव्हां ती इतकी सुबोध, रसाळ व तर्कशुद्ध रीतीनें सांगतात कीं प्रकाशाप्रमाणें पाय न वाजवतां ती मनांत घुसते. त्यांची नम्रता अलौकिक आहे. म्हणूनच ते इतके बुद्धिनिष्ठ व स्वच्छ विचार करणारे आहेत."

विनोबांच्या प्रतिपादनशैलीविषयीं लेखक म्हणतो : "या चार दिवसांत बाबा अठरा तास बोलले. पण त्यांत एकहि शब्द नीरस, रटाळ किंवा फाफट वाटला नाहीं असें मी प्रांजळपणें सांगतों. यांत यत्किंचितहि अतिशयोक्ति नाहीं. बोलतांना ते कोणत्याहि प्रकारची टिपणें वापरीत नाहींत. अत्यंत सावकाश, धीरगंभीर वाणीनें व मोजक्या शब्दांत ते आपले विचार मांडतात. लिओनार्डोच्या चित्रांत जशी एकहि रेघ फुकट सांपडाय-ची नाहीं, मोझार्टच्या संगीतांत जसा एक वायफळ स्वर आढळायचा नाहीं, शॉच्या ओळीओळीमध्यें








त्याच्या खास शैलीची जशी झाक दिसते, तसें विनोबाजींच्या वाणीचें आहे. त्यांच्या वाणींत किती आटोपशीरपणा व अर्थ असतो! त्यांच्या अंतःकरणांतील ज्ञानदीपाचा शांतसौम्य प्रकाश वाणीच्या झरोक्यातून बाहेर पडत आहे कीं काय असा भास होतो."

टेनीसन यांनीं श्री. जयप्रकाश नारायण यांचें काढलेलें शब्दचित्रहि हृदयंगम आहे. जयप्रकाश नारायण यांचा पूर्वेतिहास देऊन, स्वावलंबनानें अमेरिकेंतील विद्यालयांत त्यांनीं घेतलेलें शिक्षण, मार्क्सवादाचा केलेला पुरस्कार यांचें वर्णन त्यांनीं केलें आहे : "जयप्रकाशजींसारख्या क्रांतिवादी पुरुषानें सर्वोदयवादाचा स्वीकार करावा हें आधुनिक भारतांतील एक आश्चर्य आहे. धार्मिक मतपरिवर्तना-(conversion) चा हा एक अस्सल नमुना आहे. जयप्रकाशजींसारख्या मार्क्सवादी नेत्यानें भूदान–आंदोलनाला आपलें जीवित पुन्हां अर्पण करावें व विनोबाजींनींहि त्यांचें अनुकरण करून 'भूदानमूलक, ग्रामोद्योगप्रधान शांततामय' क्रांतीसाठीं आपलें जीवन दान द्यावें ही एक अत्यंत मंगल व स्फूर्तिदायक घटना होय. ती ज्यांनीं डोळ्यांनीं पाहिली असेल ते धन्य. तिचें वर्णन शब्दांनीं करतां येणार नाहीं. विनोबाजींचा संदेश साऱ्या जगासाठीं आहे याची जाणीव मला बोधगयेंत झाली."

"भूदानआंदोलनांत ज्या बेजमीन शेतमजुरांना जमीन देण्यांत येत आहे त्यांच्या वृत्तींत खरोखरी फरक पडणार आहे का अशी शंका मनांत येते. हजारों वर्षांच्या दास्यामुळें त्यांच्यांत निर्माण झालेली बेपर्वाई व आळस नाहींसा झाल्याशिवाय नवसमाजाचे ते कसे घटक बनूं शकेल?"

जनहृदयांत भूदानामुळें खरें परिवर्तन होणार आहे, अशी विनोबाजींची श्रद्धा आहे. युगपुरुषांमध्यें जो दुर्दम्य विश्वास असावा लागतो तो विनोबाजींच्या ठायीं पुरेपूर आहे. भूदान–आंदोलनाच्या यशापयशासंबंधीं मी निश्चित आहे असें ते नेहमीं सांगतात. ('All heroes are heroic first in faith.').

"विनोबा स्वतःविषयीं फारच क्वचित बोलतात. मी त्यांना दोनचार वैयक्तिक प्रश्न विचारण्याचें धाष्ट्र्य केलें. तेव्हां ते हंसले व म्हणाले : 'मी जसा वयानें मोठा होतो आहे तसा माझ्या मागच्या आयुष्याचा मला विसर पडत चालला आहे. मी भारताचा पुत्र आहे. भारताला जसें इतिहासाचें महत्त्व कधीं समजत नाहीं तसें मला फक्त भविष्य दिसतें आणि भूतकाळाचें विस्मरण होतें."

गेलीं पांच वर्षें विनोबांनीं सामाजिक क्रांतीच्या धामधुमींत व जनसंमर्दाच्या निकट सान्निध्यांत घालविलीं असलीं तरी त्यांचा पिंड राजकारणाचा नसून तत्त्वचिंतकाचाच आहे. गांधींना लिहिलेल्या एका पत्रांत मागें त्यांनीं लिहिलें होतें कीं "माझ्यांत अनेक दोष आहेत. पण 'ईशावास्यमिदं सर्वम्' ही जाणीव माझ्यांत वाढती आहे. हें ज्ञान जेणेंकरून वाढेल तें सत्कर्म व जेणेंकरून यांत व्यत्यय येईल तें दुष्कर्म असें मी मानतों.' त्यांचें 'मीपण' त्यांनीं रितें केलें आहे."

"संतपुरुषाला सत्कर्म म्हणून कांहीं निराळी कृति करावी लागत नाहीं. त्यांचें जगणें हेंच सत्कर्म बनतें. (The true saint does not just do good. He is, at least in some degree, goodness.)" गांधीजींप्रमाणें विनोबा हे कांहीं राजकीय संत नाहींत. कालमाहात्म्यानें या संताला सार्वजनिक उलाढालींत ढकललें आहे. म. गांधींचें राजकीय कार्य सफल झालें पण संतगांधींचें धर्मकार्य असफल राहिलें. विनोबांना तें पूर्ण करतां येईल का, हा प्रश्न टेनीसन यांनीं विचारला असून तो अत्यंत समयोचित व अर्थपूर्ण आहे यांत शंका नाहीं.

---

**क्षण—!**

क्षणांत नव्हतें अलिकडल्या अन्<br>
क्षणांत नुरलें पलिकडल्याहि<br>
–अशीच एका क्षणांत क्वचित<br>
युगायुगांची फुटली लाही

कालगतीचें चालें स्पंदन<br>
अविरत शाश्वत नित्य-निरामय<br>
क्षणांत एका सामावुनि परि<br>
झरती, झुरती जीवन-आशय.

—दे. अ. दाभोलकर








श्री. हुमायुन कबीर यांचे विचार : संकलक – सौ. कमलिनी दामले

# लोककल्याणकारी राज्याचें स्वरूप व तात्त्विक अधिष्ठान

[ भारतीय तत्त्वज्ञान-परिषदेचें गेलें अधिवेशन सीलोनमध्यें पेराडेनिया विद्यापीठांत भरलें होतें. त्या अधिवेशनाचे अध्यक्ष भारतसरकारचे शिक्षणविषयक सल्लागार श्री. हुमायुन कबीर हे होते. त्यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय 'Welfare State' ('लोककल्याणकारी राज्य') हा होता. लोककल्याणकारी राज्याचें स्वरूप व महत्त्व, त्याचें तात्त्विक अधिष्ठान इत्यादींचें श्री. कबीर यांनीं केलेलें विवेचन सखोल व विचारप्रवर्तक आहे. लोककल्याणकारी राज्याचें ध्येय हें प्रगति करूं इच्छिणाऱ्या प्रत्येक आधुनिक राष्ट्रापुढें आहे. आपला भारतहि त्या ध्येयाकडे पावलें टाकीत आहे. लोककल्याणकारी राज्याचा विचार करतां समाज व व्यक्ति यांचे संबंध कसे असावेत, नियोजन व केन्द्रीकरण हीं लोकशाहीच्या तत्त्वांस मारक होणार नाहींत ना, समाजाचा घटक जी मूळ व्यक्ति तिचें सर्वांगीण कल्याण कसें साधेल – इत्यादि अनेक प्रश्न उत्पन्न होतात. या महत्त्वाच्या प्रश्नांचा ऊहापोह श्री. कबीर यांनीं आपल्या भाषणांत केलेला आहे. त्या भाषणांतील महत्त्वाचे कांही मुद्दे खालीं दिले आहेत. –संकलक ]

## नीतिशास्त्र, अर्थशास्त्र व राज्यशास्त्र हीं अध्यात्मशास्त्राचींच अंगें

स्वतःच्या जीविताचें मर्म समजून घेण्याचा व सभोंवतालच्या दृश्य सृष्टीचें स्वरूप आकलन करण्याचा प्रयत्न करणें हें अनादिकालापासून सतत चालू असलेलें मानवाचें एक महत्त्वाचें संशोधनकार्य आहे. बाह्य विश्वाचीं अनेक रहस्यें त्यानें आजपर्यंत उकललीं आहेत पण स्वतःच्या जीविताचें कोडें त्याला अद्याप सुटलेलें नाहीं. मनुष्य एकाच वेळीं दोन परस्परभिन्न– आधिभौतिक व आध्यात्मिक राज्यांचा रहिवासी असल्यामुळें आत्म्याचें गूढ उकलण्याचें कार्य दुर्घट होऊन बसलें आहे. शिवाय मानवी जीवनाचीं – व्यष्टि व समष्टि, व्यक्तिगत व सामाजिक अशीं द्विविध अंगें या प्रश्नाला अधिक गुंतागुंतीचा करण्यास कारणीभूत होतात. त्यां पैकीं सामाजिक अंग मानवी जीवनास अत्यावश्यक असलें तरी आंतरिक जीवनाच्या बाबतींत मानव एकाकीच आहे. आपले अत्यंत मौलिक अनुभव त्याला दुसऱ्या कुणालाहि सांगतां येत नाहींत. त्याच्या अद्वितीय व्यक्तित्वाला वर्तुळाच्या केंद्रबिंदूची उपमा देतां येईल. केन्द्रबिंदु स्थान दर्शवितो पण त्याला परिमाणें नसतात. म्हणूनच परिघाचा आधार घेतल्या-शिवाय आपली बुद्धि केंद्रबिंदूचें आकलन करूं शकत नाहीं. तद्वतच समष्टीशिवाय व्यष्टीचा आविष्कार होणें अशक्य आहे. आणि म्हणूनच सामाजिक संबंधांचा विचार करणाऱ्या नीतिशास्त्र, अर्थशास्त्र व राज्यशास्त्र यांचा तत्त्वज्ञानाच्या सुरवातीपासूनच अध्यात्मशास्त्रांत समावेश करण्यांत येतो.

अर्थशास्त्र व राज्यशास्त्र हीं दोन्हीं शास्त्रें मानवा-च्या समूहजीवनांतील परस्परसंबंधांच्या अभ्यासाला वाहिलेलीं आहेत. म्हणून तीं एकमेकांशीं निगडित आहेत. अर्थशास्त्र हें मानवी जीवनाला आवश्यक अशा भौतिक साधनसामग्रीच्याच उपयुक्ततेला जास्त महत्त्व देतें. एका बाजूला मानवी आकांक्षा व गरजा यांचें अमर्याद स्वरूप व दुसऱ्या बाजूला भौतिक साधनांचा तुटपुंजेपणा – या विसंवादपूर्ण वस्तु-स्थितीवर अर्थशास्त्र आधारलेलें असतें. या विसंवादपूर्ण वस्तुस्थितीचा व्यक्ति व समाज यांच्या परस्परसंबंधांवर होणारा परिणाम राज्यशास्त्राच्या दृष्टीनें जास्त महत्त्वाचा आहे. समूहजीवनविषयक प्रश्नांना लागू पडणारें नीतिशास्त्र म्हणजेच अर्थशास्त्र व राज्यशास्त्र असें थोडक्यांत म्हणतां येईल.

व्यक्तिगत हित हें समूहहितापेक्षां दुय्यम प्रतीचें मानणें इष्ट आहे, हा राज्यनीतींतील महत्त्वाचा सिद्धांत आहे. राज्यशास्त्र त्याचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न करतें. प्रबळ मानवांनीं 'बळी तो कान पिळी' या सुप्रसिद्ध न्यायानें, आपल्यापेक्षां दुर्बळ असणाऱ्यांसाठीं हा दंडक घालून दिला, अशी या सिद्धांताची एक उपपत्ति आहे. पण तिला अनुभवाचा पुरेसा आधार








नाहीं. स्वार्थरक्षणासाठीं परस्परांच्या संमतीनें झालेला करार अशी या सिद्धान्ताची दुसरी एक उपपत्ति आहे. परंतु मानवी जीवनेतिहासांत समाजासाठीं स्वखुषीनें स्वार्थत्याग केल्याचीं उदाहरणेंहि अनेक सांपडतात. म्हणून व्यक्तिगत स्वार्थावर आधारलेली कोणतीहि उपपत्ति समाधानकारक वाटत नाहीं. राज्यनीति मानवाच्या सामाजिक सहजप्रवृत्तींशीं निगडित आहे हें आपणास विसरतां येत नाहीं.

मानवसमाजाचें राजकीय स्वरूप हें त्याच्या आर्थिक व्यवस्थेचें प्रतिबिंब असतें हा मार्क्सवादाचा मुख्य दावा आहे. आर्थिक संबंध म्हणजे वर्गावर्गांतील लढे व राज्य हें वर्गशोषणाचें साधन होय, असें मार्क्सचें मत आहे. उत्पादनाच्या साधनांवर ज्यांचें स्वामित्व, त्यांच्याच हातीं राज्यसत्ता जाते. आतांपर्यंतचा राज्यसत्तेचा इतिहास हेंच सांगतो कीं सत्ता ही नेहमींच शोषणास साधनीभूत होत आली आहे. वर्गविहीन समाजाची स्थापना करणें आणि ' कुवतीप्रमाणें काम, गरजेप्रमाणें दाम ' हें साम्यवादाचें ब्रीदवाक्य शिरसावंद्य मानून लोककल्याणकारी राज्य निर्माण करणें हाच वर्गशोषण थांबविण्याचा एकमेव मार्ग होय.

## ' लोककल्याण-राज्य ' या कल्पनेचा उदय

आधुनिक राज्यशास्त्राच्या विकासांत ' लोककल्याणकारी राज्य ' या कल्पनेचा उदय ही एक नेत्रदीपक घटना आहे. तिचें श्रेय बहुतांशीं लोकशाहीला दिलें पाहिजे यांत शंका नाहीं. कारण सर्व स्वतंत्र राष्ट्रें या नवीन कल्पनेचें स्वागत करण्यास उद्युक्त झालीं आहेत. परन्तु या सर्वतोमुखी झालेल्या कल्पनेचा खरा अर्थ फारच थोड्या लोकांना कळतो. कुणी दंडुकेशाही व लोककल्याणकारी राज्य यांच्यांतील विरोध दाखवून या कल्पनेचा अर्थ लावूं पहातात. कायदा व सुव्यवस्था यांच्याशिवाय नागरिकांच्या इतर गरजांचा विचार न करणारी जी दंडुकेशाही तिच्याविरुद्ध जें तें लोककल्याणकारी राज्य होय, अशी अभावात्मक व्याख्या ते करतात. राज्याच्या संरक्षणासाठीं व अंतर्गत शांततेसाठीं कायदेकानू व पोलीसबंदोबस्त आवश्यक आहेत हें मान्य केलें तरी लोकांचें सामाजिक जीवन समृद्ध व्हावयास आणखी अनेक गोष्टी आवश्यक आहेत हें विसरून चालत नाहीं. शिस्तीच्या चौकटीची मर्यादा सांभाळून आपलें वैयक्तिक किंवा सामाजिक जीवन अधिक सुखी व समृद्ध करण्याची मुभा पोलीस-राज्यांतहि असते. पण असे प्रयत्न व्यक्तिशः किंवा समूहद्वारा होताहेत किंवा नाहीं हें पहाण्याचें काम अशा राज्याच्या कक्षेंत येत नसतें. त्यामुळें, मानवी जीवनाच्या आर्थिक, सामाजिक, धार्मिक, कलात्मक इत्यादि अंगांची उपेक्षा साहजिकच होते लोककल्याणाबद्दल उदासीन वृत्ति धारण करणाऱ्या अशा राज्यसत्तेची जागा आतां वैयक्तिक व सामाजिक जीवनाच्या प्रत्येक अंगाबद्दल आस्था बाळगणाऱ्या उदार आश्रयदात्याची भूमिका स्वीकारणाऱ्या राज्यसत्तेनें घेतली आहे.

राज्यसत्तेच्या कार्यक्षेत्रांत झालेल्या या विकासाची ऐतिहासिक व मानसशास्त्रीय कारणमीमांसा समजून घेणें अवश्य आहे. या कारणांत ऐतिहासिक परिवर्तनांचाहि भाग आहे. उद्योगधंद्यांची वाढ व त्यामुळें शहरांतील लोकसंख्येंत पडलेली भर या दोन्ही फरकांमुळें शहरी जीवनांतील सामाजिक बंधनें शिथिल होऊन गेलीं आहेत. खेडेगांवांतील शेतकीप्रधान समाज लहानसा व आटोपशीर असल्यामुळें ग्रामीण जीवनांत, शेजारधर्म हा नित्याचा व आवश्यक समजला जात असे. उलट पक्षीं, उद्योगप्रधान शहरी वस्तींत शेजारच्या खोलींत राहणारीं माणसें एकमेकांना ओळखतसुद्धां नाहींत. प्रत्येकजण आपापल्या व्यवसायांत दंग असतो. त्याला दुसऱ्याचा विचार करावयास वेळ नसतो. या स्वकेंद्रित व समाजपराङ्मुख वृत्तीचा परिणाम कौटुंबिक जीवनावरहि होऊं लागला. भारतांतील एकत्रकुटुंबपद्धतीचें उदाहरण घेतल्यास, ती संस्था बेकारी, आजारीपण व म्हातारपण या अवस्थांमध्यें माणसाला आधार देत असे. सहकार्याचे व सामाजिक जीवनाचे धडे घरच्या घरींच गिरविण्याची संधि मुलांस मिळत असे. पण या पद्धतीच्या ऱ्हासाबरोबर बेकार, आजारी व वृद्ध नागरिकांच्या संगोपनाची जबाबदारी सरकारच्या अंगावर येऊन पडली. तसेंच कार्यक्षम नागरिक तयार करण्याचें कामहि शैक्षणिक संस्थांकडून करून घ्यावें लागत आहे.

ऐतिहासिक परिवर्तनाबरोबरच लोकशाहीच्या पुरस्कारामुळें मानवाच्या मनोरचनेंतहि बदल घडून आला. अलिकडेच होऊं लागलेली व्यक्तित्वाची जाणीव हें त्याचें मुख्य उदाहरण होय. स्वतःच्या








हिताबद्दल निर्णय घेण्याचा हक्क व्यक्तिगत आहे असें मानणारा नागरिक, कौटुंबिक आधार नाहींसा झाल्यामुळें, व्यक्तिनिरपेक्ष राज्यसत्तेच्या आश्रयावर अवलंबून राहण्यास मागेंपुढें पाहीनासा झाला, म्हणजेच कौटुंबिक आधाराचें रूपांतर सरकारी आधारांत होऊं लागतें.

अशा प्रकारें लोककल्याणकारी राज्य या व्यक्तिनिरपेक्ष संस्थेंत समाजसेवेचें कार्य व व्यवस्था केंद्रीभूत होऊं लागलीं. केंद्रीकरणाकडे असलेला हा कल सध्यांच्या परिस्थितींत अटळ होऊन बसलेला आहे. समाजाच्या प्रत्येक घटकापर्यंत विवक्षित सुखसाधनें पोंचविलीं पाहिजेत अशी कल्याणकारी राज्याची प्रतिज्ञा असेल तर प्राप्त परिस्थितींत तिची पूर्ति दोन अटींवर करतां येईल : ( १ ) साधनसामग्री मर्यादित असल्यामुळें हक्कदारांमध्यें निवड करण्यासाठीं केंद्रीय संस्थेची आवश्यकता गृहीत धरणें. ( २ ) कोणत्याहि प्रदेशाला कमी-अधिक फायदा मिळूं नये म्हणून नियोजन मान्य करणें. यांमुळें, साहजिकच केंद्रीकरण व नियोजन हीं लोककल्याणकारी राज्याचीं प्रमुख वैशिष्ट्यें मानण्यांत येऊं लागलीं.

पूर्वीच्या समाजरचनेंत निरनिराळ्या संस्थांना वांटून दिलेलीं कामें लोककल्याणकारी राज्य आपल्याकडे घेण्याचा प्रयत्न करीत आहे. तथापि, राज्य ही कल्पना अमूर्त आहे. शेवटीं, अल्पसंख्य व्यक्तींनीं बनलेल्या सरकाराकडूनच त्याचें कार्य चालतें हें विसरून चालणार नाहीं. हीं माणसें, कितीहि सुज्ञ व सदिच्छाप्रेरित असलीं, तरी त्यांच्या कर्तृत्वाला मर्यादा असतेच. म्हणून लोककल्याणकारी राज्यांत, सत्ताधारी लोकांचें हित तेंच सर्वांचें हित असा गैरसमज होणें साहजिक आहे, आणि त्यामुळें हुकूमशाहीचें बीजारोपण व्हायला अनुकूल परिस्थिति निर्माण होते.

## लोककल्याणाचें स्वरूप व व्याप्ति

लोककल्याणाच्या कल्पनेचें पुरेसें विवरण करण्याचा प्रयत्न अद्याप फारसा कोणीं केलेला आढळून येत नाहीं. कांहीं सुखसोयी करून दिल्या कीं लोककल्याण साधेल असें नेहमीं गृहीत धरलें जातें आणि लोकांच्या बाह्य वर्तनावरून ते सुखी आहेत कीं नाहींत हें ठरविण्यांत येतें. पण आपल्या सत्तेची व कार्यक्षेत्राची मर्यादा सरकार पाळीत नाहीं असा नेहमींच अनुभव येतो. कोणतेंहि सरकार आपल्यास अनुकूल अशी शिक्षणप्रणाली तयार करून जनतेचे विचार व दृष्टिकोन यांच्यावर नियंत्रण घालतें. आचारांत सारखेपणा असावा अशी इच्छा असल्यास विचारहि ठराविक छापाचे करण्याचा प्रयत्न होतो. कारण शेवटीं आचार हा विचार, भावना व इच्छाशक्ति यांचा परिणाम असतो. दळणवळणाची वाढ व वैज्ञानिक शोध यांमुळें राष्ट्राराष्ट्रांतील अंतर कमी झालें आहे आणि निरनिराळ्या मानवी समाजांचे परस्पर-हितसंबंध दिवसेंदिवस अधिक निगडित होत आहेत. प्रचार ही एक नवीन व उपयुक्त कला जन्मास आली आहे. वर्तमानपत्रें, चित्रपट, नभोवाणी, टेलिव्हिजन वगैरेंच्या सहाय्यानें कोणत्याही कार्याबद्दल जनतेंत उत्साह निर्माण करणें हें अत्यंत सुलभ झालें आहे. अशा प्रकारें आधुनिक काळांत व्यक्तिस्वातंत्र्यावरील सरकारी दडपण वाढत आहे. आणि त्यामुळें व्यक्तिस्वातंत्र्य अजिबात नष्ट होण्याचा धोका निर्माण झाला आहे !

एकीकडे विचार व भावना यांच्या द्वारें आचाराचें परिवर्तन घडवून आणण्याचा प्रयत्न व दुसरीकडे भौतिक सुखसाधनांतच लोककल्याण समाविष्ट आहे असें मानणें — ही विचित्र विसंगति लोककल्याणकारी राज्याच्या कारभारांत दिसून येते. लोककल्याणाचे मानसिक किंवा आध्यात्मिक घटक कुणी विचारांत घेत नाहीं. भौतिक सुखसाधनांच्या वाढीमुळें मनुष्य सुखी झाला आहे कीं नाहीं याबद्दल कुणीहि चौकशी करीत नाहीं. नवीन सुखसोयींमुळें व जीवनमान उंचावल्यामुळें मनुष्याच्या सुखांत भर पडली आहे काय ? वाढती व्यक्तिनिष्ठा सर्वस्वीं हितकारक आहे काय ? — असेल प्रश्न उत्पन्न होतात. पण ते उपस्थित करणें योग्य होणार नाहीं. कारण सुखी जीवनास आवश्यक अशा भौतिक गोष्टींचा पुरवठा करणें एवढेंच सरकारचें कर्तव्य आहे. मानवी जीवनाच्या शारीरिक, मानसिक व आध्यात्मिक स्वास्थ्याला आवश्यक असलेलें किमान जीवनमान प्रथमच सर्वांच्या आवांक्यांत आणून देणें ही लोककल्याणकारी राज्यानें मोठीच कामगिरी बजाविली हें कोणीहि कबूल करील.

## लोककल्याणकारी राज्यामागील तत्त्वज्ञान

लोककल्याणकारी राज्याचें समर्थन उपयुक्ततावादानेंच होईल असें कांहीं लोकांचें मत आहे. कारण अशा राज्यव्यवस्थेंत व्यक्तीचें हित सामाजिक हितापेक्षां



अनुक्रमणिका






दुय्यम प्रतीचें मानतात. पुष्कळ जणांचें पुष्कळ हित साधणें हा व्यक्तिगत व समूहगत जीवनाचा उद्देश असावा हें तत्त्व उपयुक्ततावादानें मान्य केलेलें आहे. पण हें तत्त्व वरवरचें असून दिशाभूल करणारें आहे. सुखाला किंवा कल्याणाला संख्यावाचक मापानें मोजणें अशक्य आहे हा एकच आक्षेप लक्षांत घेतला तरी उपयुक्ततावादाला कुणीहि विचारवंत मान्यता देणार नाहीं. व्यक्तिसन्मान किंवा व्यक्तीची प्रतिष्ठा हें लोककल्याणकारी राज्याचें पायाभूत तत्त्व आहे. लोकशाहीच्या कल्पनेंतूनच लोककल्याणकारी राज्याची कल्पना जन्मास आली. प्रथम राजकीय समतेलाच मान्यता देण्यांत आली. परन्तु ती सत्यसृष्टींत उतरायला मानवी जीवनाच्या इतर प्रांतांतहि समता वावरणें आवश्यक आहे हें हळूंहळूं स्पष्ट दिसूं लागलें. परिणामीं, इतरांचे आर्थिक व सामाजिक शोषण करण्याच्या वैयक्तिक हक्कांवर नियंत्रण आलें. त्याकरितां सामाजिक व कामगारविषयक कायदे झाले. शिवाय सर्वांना समान संधि मिळावी म्हणून लोककल्याणकेंद्रें अधिक प्रमाणांत उघडण्यांत येऊं लागलीं.

लोककल्याणकारी राज्याचा आधार लोकशाही आहे ही गोष्ट केंद्रित नियोजनाला मिळालेल्या महत्त्वामुळें चटकन् लक्ष्यांत येत नाहीं. प्रथमदर्शनीं लोकशाही व नियोजन यांच्यामध्यें विसंगति आढळते. कारण लोकशाही व्यक्तिस्वातंत्र्य व स्वयंकर्तृत्व यांवर अवलंबून आहे. पण हा विरोध अटळ नाहीं. कारण एक तर लोकशाहींत सुद्धां इतरांचें स्वातंत्र्य अबाधित रहावें म्हणून व्यक्तिस्वातंत्र्याला मुरड घालणें आवश्यक असतें. दुसरी गोष्ट म्हणजे नियोजन हें वरूनच लादलेलें असलें पाहिजे असा कांहीं दंडक नाहीं.

आणखीहि कित्येक समजुतींतून लोकशाहीचा उगम झाला आहे. त्यापैकीं एक, आपण सर्व एकाच परमेश्वराचीं लेकरें आहोंत व तो सर्वांस समान लेखतो ही धार्मिक श्रद्धा ही आहे. सामाजिक व आर्थिक दर्जा किंवा गुणविशेष (special gifts) यांमुळें उत्पन्न होणारे भेदभाव लोकशाहीला मान्य नाहींत याचें कारण लोकशाहीचा मानवाच्या मूलभूत समतेवर विश्वास हें होय.

## कांटचीं तीन तत्त्वें

सूक्ष्म विचार केला असतां मानवाची, आत्मप्रतिष्ठा हेंच अंतिम मूल्य अशी श्रद्धा बाळगणारें तत्त्वज्ञान हेंच लोककल्याणकारी राज्याचें खरें अधिष्ठान होय, असें आढळून येईल. " अधिकांत अधिक माणसांचें अधिकांत अधिक सुख साधणें " हें उपयुक्ततावादाचें उद्दिष्ट याही मतप्रणालीला मान्य आहे. पण व्यक्तीला समष्टीच्या सुखाचें साधन समजावें हा सिद्धांत या तत्त्वज्ञानाला पसंत नाहीं. मनुष्याला स्वतंत्र मूल्य आहे या तत्त्वाचें कांटच्या 'नैतिक कायद्या'शीं बरेंच साम्य असल्यामुळें, त्याच्या 'Categorical Imperative' चें निरपेक्ष आदेशाचें त्रिविध स्वरूप हें लोककल्याणकारी राज्याचें तात्त्विक अधिष्ठान म्हणतां येईल. त्या त्रिविध आदेशाचें पहिलें तत्त्व हें कीं कोणताहि नीतिनियम सार्वत्रिक करतां आला तरच त्याला मान्यता द्यावी; म्हणजे स्वतःस अपवाद समजून कुणाहि व्यक्तीस कोणत्याहि नीतिनियमाचें उल्लंघन करतां येणार नाहीं. समान हक्क व समान संधि देण्याचा उद्देश याच तत्त्वावर आधारलेला आहे.

कांटचें दुसरें तत्त्व म्हणजे व्यक्तिसन्मान, किंवा व्यक्तीची प्रतिष्ठा हें होय. कोणाहि व्यक्तीला केवळ साधन म्हणून न वापरतां तिला अंतिम मूल्यहि आहे हें मान्य झालें पाहिजे. प्रत्येक व्यक्ति साध्य व साधन दोन्हीहि असते असें प्रतिपादन केल्यामुळें समाज व व्यक्ति यांतील विरोध नाहींसा होतो. कल्याणकारी राज्यामध्यें समाजाचें हित व त्याची प्रगति हें ध्येय प्रत्येक व्यक्तीला स्वीकारावें लागतें पण एका अटीवर. ती अट म्हणजे तिच्या व्यक्तित्वाला बाध येतां कामा नये.

याच्यापुढची पायरी म्हणजे प्रत्येक व्यक्तीनें स्वतःस, ' साध्यांच्या ' राज्याचें ( Kingdom of Ends ) आपण एक घटक आहोंत असें समजलें पाहिजे हें कांटचें तिसरें तत्त्व होय. पहिलें तत्त्व मानवी समतेचें, तर दुसरें व्यक्तिसन्मानाचें स्वरूप स्पष्ट करतें. तिसऱ्या तत्त्वामुळें सामाजिक सहकार्याचें स्वरूप स्पष्ट होतें. सहकार्याच्या कल्पनेमुळें साध्यसाधन यांतील भेद कमी जाणवतो; इतकेंच नव्हे तर नैतिक जीवन हें प्रायः समाजाभिमुख असतें हें सूचित होतें. जेथें प्रत्येक व्यक्ति दुसऱ्याचें हित स्वतःच्या हिताइतकेंच महत्त्वाचें समजते, अशा समाजामध्यें घटक म्हणून वावरण्यांत माणसांना सुखसमाधान प्राप्त होणें शक्य आहे. प्रत्येक व्यक्ति साध्य व साधन








दोन्हीहि आहे व दुसऱ्याचें हित साधण्यानेंच व्यक्ति स्वतःची उन्नति करून घेऊं शकेल. लोककल्याणकारी राज्य हें समाजहितासाठींच व्यक्तींवर निर्बंध घालतें आणि ज्या अर्थी समाज हा व्यक्तींचा बनलेला आहे त्या अर्थी ते निर्बंध शेवटीं व्यक्तीच्या हितासच उपकारक ठरतात.

## गांधीजींचा सर्वोदयवाद

महात्मा गांधींची लोककल्याणकारी राज्याची म्हणजेच सर्वोदयाची कल्पना ही विशेष उल्लेखनीय आहे. त्यांच्या पूर्वींच्या सर्व लोकांनीं व्यक्तिगत हक्कांना महत्त्व दिलें आणि समाजाच्या हक्कांमुळें त्यांची हेळसांड होऊं नये याची खबरदारी घेतली. पण महात्माजींची सर्वोदयाची कल्पना व्यक्तीच्या जबाबदारींतून उदयास आली आहे. "चांगल्या प्रकारें कर्तव्य बजावलें तरच हक्क शाबित होतात. जगाचा नागरिक या नात्यानें मानवानें आपलें कर्तव्य बजावलें तरच त्याला जगण्याचा हक्क प्राप्त होतो. इतर मार्गांनीं संपादन केलेले हक्क अन्यायमूलक व क्षुल्लक होत." अशी त्यांची निष्ठा होती. व्यक्तीच्या हक्काची घोषणा करणें एके काळीं आवश्यक होतें. पण हळूं हळूं व्यक्तिस्वातंत्र्याच्या अमर्याद कल्पनेमुळें समाजव्यवस्थेची घडी विस्कळित होऊं लागली, इतकेंच नव्हे तर व्यक्तिविषयक कल्याणाची बैठकहि हादरूं लागली. या उलट, व्यक्तीनें आपलें कर्तव्यपालन केलें तरच समाज टिकून राहील, व्यक्तीचें कर्तव्यपालन हें समाजाला एकत्र निगडित ठेवणारें प्रभावी साधन होय—हें सांगून म. गांधींनीं कर्तव्याचें महत्त्व आवर्जून सांगितलें आणि शरीर व त्याचे अवयव यांतील जिवंत ऐक्याप्रमाणें समाज व त्यांतील व्यक्ति यांतील जिवंत ऐक्याचा सिद्धान्त आधुनिक काळीं पुन्हां मांडून दाखविला.

महात्माजींच्या सर्वोदयाच्या कल्पनेमुळें आधुनिक मानवसमाजाला आणखी एका बाबतींत धोक्याची सूचना मिळाली आहे. अतिशय मोठ्या प्रमाणावर होणाऱ्या मतप्रचारामुळें व यंत्रयुगीन सुधारणांमुळें मानवांच्या व्यक्तित्वाचा लोप होऊन ते समाजयंत्राचे लहानसहान निर्जीव भाग बनत आहेत. ही परिस्थिति वेळेवरच सुधारण्यासाठीं यंत्र हें माणसाचें दास राहील व त्याला आपले दास करणार नाहीं अशी खबरदारी घेणें आवश्यक आहे असें गांधीजींनीं प्रतिपादिलें. ज्यामुळें व्यक्तिस्वातंत्र्य व व्यक्तिसन्मान नष्ट होतो अशा मोठ्या प्रमाणावर होणाऱ्या औद्योगीकरणाला त्यांचा विरोध होता. राज्यसत्तेचें हळूंहळूं विस्तृत होणारें अधिकारक्षेत्रहि त्यांना मान्य नव्हतें. विवक्षित मर्यादेपलीकडे गेलेली संघटना व्यक्तिनिरपेक्ष व जवळजवळ अमानुष स्वरूप धारण करूं पाहते असें त्यांचें मत होतें. म्हणून उद्योगधंदे व राज्यसत्ता या दोहोंच्याहि विकेंद्रीकरणाचा पुरस्कार ते करीत असत.

महात्माजींची सर्वोदयाची कल्पना समाजाच्या एकसंधी स्वरूपाच्या स्पष्ट जाणिवेवर आधारलेली आहे. अशी जाणीव जेथें दिसून येते तेथें समाजाचें हित व्यक्तीवर कुणी लादलेलें नसतें किंवा तें वैयक्तिक हिताला बाधक नसतें. जें साध्य ठरवावयाचें तें परस्पर देवघेवीच्या व्यवहारामुळें सर्वांच्या संमतीनें ठरविलें जातें आणि नियोजनहि सर्वांच्या सहकारी प्रयत्नांचा परिपाक असतें. म. गांधींच्या शब्दांत सांगायचें म्हणजे, "ह्या अथांग जीवनसागरांत खोल बुडी मारून त्याच्याशीं एकरूप झाल्याशिवाय सत्याचा साक्षात्कार होणें अशक्य आहे. म्हणून माझ्या मतें समाजसेवेशिवाय दुसरा तरणोपाय नाहीं. खरी समाजसेवा समग्रजीवनस्पर्शी असणें अनिवार्य आहे. या जीवनदर्शनांत उच्चनीच भाव विलीन होतात म्हणजेच 'एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति' या वचनाची प्रतीति येते."

---

## पत्रव्यवहार

### 'जीवकचिंतामणी'चे आधारभूत ग्रंथ

श्री. संपादक यांस,

आपल्या मासिकाच्या सप्टेंबर १९५५ च्या अंकांत श्री. माचवे यांचा '**तमिळ साहित्याचा संक्षिप्त इतिहास**' हा लेख प्रकाशित झाला. त्यांत पान ५ वर 'जीवकचिंतामणि' या ग्रंथाविषयीं लिहितांना तीन चुका झाल्या आहेत. बहुधा लिपीच्या दोषामुळें या चुका उद्भवल्या असाव्या. त्या चुका अशा :

(१) '**जीवकचिंतामणी**'चा आधारभूत ग्रंथ 'श्रीपुराण' नसून '**उत्तरपुराण**' (गुणभद्रकृत) आहे. (२) दुसरा आधारभूत ग्रंथ '**शास्त्रचूडामणि**' नसून '**क्षत्रचूडामणि**' आहे. (३) '**क्षत्रचूडामणी**'-चे कर्ते 'वादीपसिंह' नसून '**वादीभसिंह**' आहेत.

'क्षत्रचूडामणी'चे विद्वान् संपादक श्री. टी. एस्. कुप्पुस्वामी शास्त्री यांच्या प्रस्तावनेवरून वरील चुका अगदी सहज लक्षांत येऊं शकतात.

१५।१०।५५, नागपूर

आपला
विद्याधर जोहरापूरकर









श्री. शंकरराव देव

# गोवा-स्वातंत्र्यसंग्राम आणि सत्याग्रह

गोव्याचा स्वातंत्र्याचा संग्राम आणि काँग्रेसनें व विशेषतः भारत-सरकारनें त्याविषयीं घेतलेली भूमिका यांमुळें सत्याग्रहाचें शास्त्र व तंत्र याविषयीं देशांत जी चर्चा अथवा वाद चालू झाला, तो लोकशिक्षणाच्या दृष्टीनें स्वागतार्हच होय. कारण लोकशिक्षण हा लोकशाहीचा प्राण आहे. मात्र ही चर्चा लोकशिक्षणाला उपकारक व्हायची असेल तर ती सत्यान्वेषणाच्या दृष्टीनेंच झाली पाहिजे. कारण, सत्यशोधनाच्या हेतूनें झालेल्या वादालाच तत्त्वबोधाचें फळ लागत असतें.

## भारताचें परराष्ट्रीय धोरण

भारत-सरकारचें आजचें परराष्ट्रीय धोरण केवळ श्री. जवाहरलाल नेहरू या व्यक्तीचें अथवा काँग्रेस-पक्षाचेंच केवळ नसून तें सर्व भारताचें आहे. तें आपल्या प्राचीन इतिहासांतून व नजीकच्या भूतकालांतून, तसेंच आपलें राष्ट्रीय स्वातंत्र्याचें आंदोलन करतांना वेळोवेळीं ज्यांचा आपण उद्घोष केला आहे अशा निरनिराळ्या आदर्शांतून उत्स्फूर्त झालें आहे. या सर्व गोष्टींवर आपण आपली मति ज्या प्रमाणांत स्थिर करूं त्या प्रमाणांत आपल्यापुढें वाढून आलेली ऐतिहासिक कामगिरी पार पाडण्याला आपण समर्थ होऊं. भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचें ध्येय जागतिक शांतता प्रस्थापित करणें हें असून ज्या गोष्टी जगाला युद्धाकडे खेंचून नेतील किंवा युद्धाला जगाच्या जवळ आणतील त्या सर्व गोष्टींना कसून विरोध करणें हें त्याचें धोरण आहे. या ध्येयाला व धोरणाला सुसंगत व सुसंवादी असाच आपला आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय व्यवहार राहील, असा आपला सर्वांचा जागरूकतेनें व कटाक्षानें प्रयत्न असला पाहिजे. या बाबतींत पंडितजींची धारणा सदा अविचलित राहिली आहे. म्हणूनच गोव्याच्या स्वातंत्र्याच्या लढ्यानें आव्हान दिलें असताहि आत्मरक्षणाशिवाय भारत कधींहि "करीं शस्त्र धरणार नाहीं" या आपल्या प्रतिज्ञेचा त्यांनीं भंग होऊं दिला नाहीं. जोपर्यंत लोकांनीं आत्मसंरक्षणासाठीं शस्त्राला म्हणजेच युद्धाला दुसरा पर्याय शोधून काढला नाहीं, तोंपर्यंत सरकार या संस्थेचें, जागतिक शांततेला सुसंगत व पोषक असें पंडितजींच्या आजच्या धोरणाहून, भिन्न असें दुसरें धोरण असूं शकेल याची कल्पना करतां येत नाहीं.

पण सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट असलेली ही गोष्ट स्वतःला डोळस म्हणविणाऱ्या कांहीं थोर मंडळींना अद्यापही दिसत नाही याचें आश्चर्य वाटल्यावांचून राहत नाहीं. भारत-सरकारच्या परराष्ट्रीय धोरणाला मान्यता देणाऱ्या व त्याचे पोवाडे गाणाऱ्या मंडळींत भारत-सरकारनें गोवा स्वतंत्र करण्यासाठीं पोलिस-कारवाई करावी अशी मागणी करणारी कांहीं मंडळी होती व आजही आहेत. गेल्या डिसेंबर १९५४ च्या **'नवभारतां'त 'भारताचें परराष्ट्रीय धोरण : एक दृष्टिकोन'** हा लेख मीं लिहिला होता. त्यांत मी म्हटलें होतें कीं "आचार्य कृपलानींसारख्या तीक्ष्ण बुद्धीच्या राजकारणी मुत्सद्द्यालाहि भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचें सम्यक् आकलन होऊं नये व त्यांनीं भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचा समग्रतेनें विचार न करतां, काश्मीर अथवा गोवा, पाँडेचरी यांबाबतच्या धोरणाचा एकांगीपणें विचार करून भारत-सरकारला दोष देण्यास तयार व्हावें ही खरोखरच जितकी आश्चर्याची तितकीच खेदाची गोष्ट आहे. ... ... गोवा किंवा पाँडिचरी हे भारताचे अविभाज्य भाग आहेत व ते स्वतंत्र होऊन भारतांत सामील झालेच पाहिजेत या बाबतींत भारतीय सरकार व जनता यांमध्यें दुमत नाहीं. जो कांहीं आतां मतभेदाचा प्रश्न आहे तो त्यांनें हें स्वातंत्र्य कोणी, केव्हां व कसें संपादन करावें यांबद्दल आहे. पाँडिचरी व गोवा हे अगदीं चिमुकले प्रदेश असले तरी ते फ्रान्स व पोर्तुगाल या परकी देशाच्या ताब्यांत आहेत म्हणून भारत-सरकारनें त्या बाबतींत








कांहींहि केलें तरी तो आन्तरराष्ट्रीय प्रश्न बनणें अपरिहार्यच आहे. त्या प्रश्नाच्या सोडवणुकीला भारताच्या परराष्ट्रीय धोरणाशीं विसंगत अशी भिन्न नीति अवलंबिणें अयोग्य आहे ".

गोवा-विमोचनासाठी पोलिस-कारवाई करावी असें म्हणणाऱ्यांत आज आचार्य कृपलानी नाहींत असें दिसतें. या विचारपरिवर्तनाबद्दल आचार्य कृपलानींचें अभिनंदन केलें पाहिजे.

## भारत-सरकारचा मार्ग

कांहींजणांकडून असा युक्तिवाद केला जातो कीं, चिमुकल्या गोव्याच्या विमोचनासाठीं केलेल्या छोट्याशा लढाईतून जागतिक युद्धाचा वणवा भडकेल ही भीति अनाठायीं असून गोव्याबद्दलची भारताची भूमिका न्याय्य असल्यामुळें जगांतील न्यायप्रिय लहान-मोठे देश भारताच्या या कृतीकडे हेतुपूर्वक दुर्लक्ष व कानाडोळा करतील. या युक्तिवादाला पंडितजींनीं पुढील वास्तववादी पण मार्मिक उत्तर दिलें आहे : " एखादें युद्ध हें एक छोटेंसें युद्ध आहे ही वस्तुस्थिति त्याचा युद्धपणा कांहीं कमी करीत नाहीं. एका विशिष्ट परिस्थितींत जर लहान युद्ध समर्थनीय असेल तर दुसऱ्या एका परिस्थितींत महान् युद्धहि समर्थनीय होऊं शकेल. मग युद्ध टाळावें व शांततेच्या मार्गानें प्रश्न सोडवावेत या म्हणण्याला कांहीं अर्थ राहात नाहीं. " पण माझ्या मतें भारतानें गोव्यासाठीं लहानसें कां होईना युद्ध केलें तर त्यांतून जागतिक युद्धाच्या संभाव्य परिणामांहूनहि अधिक भयंकर अशी एक गोष्ट निघेल. भारत आज आपल्या विचारानें, वाणीनें व कृतीनें विश्वशांतिविषयक श्रद्धेचें व शाश्वतीचें स्थान बनला आहे. अशा स्थितींत भारत गोव्यासाठीं लहानशी लढाई करील तर भारत संधिसाधु आहे असें जगाला वाटेल व भारतावरील त्याच्या श्रद्धेला धक्का बसेल. या घटनेमुळें जगाचें जें नुकसान होईल तें जागतिक युद्धांत होणाऱ्या नुकसानापेक्षां कितीतरी अधिक असेल ! म्हणून कोणत्याहि परिस्थितींत गोव्याच्या स्वातंत्र्यासाठीं आपण म्यानांतून तलवार बाहेर काढणार नाहीं या पंडितजींच्या प्रतिज्ञेला भारतीयांनीं भीष्मप्रतिज्ञेप्रमाणें मान दिला पाहिजे. त्यांत जगाचें, भारताचें व गोव्याचेंहि खरें कल्याण आहे.

पण गोव्याच्या स्वातंत्र्यासाठीं भारत-सरकार केव्हांहि शस्त्र उचलणार नाहीं असें म्हटल्यानें किंवा मान्य केल्यानें गोव्याच्या स्वातंत्र्याचा प्रश्न सुटत नाहीं. आणि तो तर सुटला पाहिजे. पोर्तुगालला गोवा सोडलाच पाहिजे याबद्दल पंडितजींचें मन 'गतसंदेह' आहे. स्वतंत्र गोव्याला भारतामध्यें सामील झालेंच पाहिजे किंवा कसें याबद्दल मात्र पंडितजींच्या मनाचा अद्याप अखेरचा निर्णय झालेला नाहीं.---याचें कारण, स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाच्या मर्यादेबाबत त्यांच्या मनाचा ' संशयो ' अद्याप फिटलेला नाहीं, हेंच होय.

भारत-सरकारला शस्त्र उचलणें शक्य असलें तरी तें तें उचलणार नाहीं व पंडितजी स्वतः सांगतात त्याप्रमाणें भारत-सरकारला पोर्तुगाल-सरकारच्या विरुद्ध सत्याग्रह करणें शक्य नाहीं. मग भारत-सरकार गोव्याच्या स्वातंत्र्याचा प्रश्न कसा सोडविणार ? भारत-सरकारनें गोव्याच्या स्वातंत्र्याचा प्रश्न सर्व प्रकारच्या शांतिमय मार्गांनीं सोडविण्याचा आपला निर्धार अनेक वेळां जाहीर केला आहे : लष्करी सामर्थ्यानें गोवा घेणें आपल्याला सहज शक्य आहे, पण तसें करणें आपण ज्या महान् तत्त्वांचा पुरस्कार करीत आहोंत व जगाच्या दृष्टीनें ज्यांचें आपण प्रतीक बनलों आहोंत त्या तत्त्वांच्या विरुद्ध होईल व गोव्याच्या हिताच्या दृष्टीनेंहि हानिकारक ठरेल.

सरकारच्या या शांततेच्या मार्गांत सत्याग्रह येत नाहीं किंवा येऊं शकत नाहीं. तेव्हां सरकारला शांततेचे दुसरे मार्ग कोणते शिल्लक उरतात याचा विचार केला पाहिजे. अनेक वकिलातींच्या द्वारें पोर्तुगालवर राजकीय दडपण आणण्याचा प्रयत्न करणें हा एक मार्ग होऊं शकेल. पण त्याच्या परिणामकारकतेबद्दल लोकांना विश्वास नाहीं. सरकारच्या हातांतील कांहीं अंशानें परिणामकारक साधन म्हणजे सर्व बाजूंनीं गोव्याची आर्थिक नाकेबंदी करणें हा होय. या दृष्टीनें भारत-सरकारनें भारत-गोवा-सरहद्द अजिबात बंद केली आहे. त्यामुळें माणूसच काय पण पशूहि इकडून तिकडे जाऊं शकत नाहीं. – ( त्याला गोव्याचे नागरिक व गोव्यांत असलेले कांहीं भारतीयच अपवाद आहेत. ) – अर्थात् निर्वाणीचा उपाय म्हणून शस्त्र उचलण्यापूर्वी शत्रूला वठणीवर आणण्यासाठीं कोणतेंहि सरकार प्रथम हे उपाय अमलांत आणतेंच. पण हे उपाय नेहमीं यशस्वी होतातच असें नाहीं. त्या पक्षीं दुसरें कोणतेंहि सरकार








युद्धाचा अवलंब करील. पण भारत-सरकार तसें न करण्याला वचनबद्ध आहे. म्हणजे भारतसरकारच्या गोवासरहद्द बंद करण्याच्या धोरणाचा अर्थ असा कीं भारत-सरकार पोर्तुगाल-सरकाराविरुद्ध एक प्रकारचा निःशस्त्र प्रतिकारच करीत आहे. प्रतिपक्षाचें नुकसान करून त्याला वठणीवर आणणें या गोष्टीचा निःशस्त्र प्रतिकारांत अंतर्भाव होतो. सरकार या संस्थेच्या दृष्टीनें विचार केला तर असें करण्यांत भारत-सरकारनें शांततेसाठीं हें एक मोठें प्रगतिपर पाऊल उचललें आहे असें आपल्याला अभिमानानें म्हणतां येईल. पण हा निःशस्त्र प्रतिकार यशस्वी झाला नाहीं तर ? भारत-सरकारच्या परराष्ट्रीय धोरणांतील जर कोणतें एक मोठें न्यून असेल तर तें त्या धोरणामागें अंतिम शक्ति वा बल (ultimate sanction) नाहीं हेंच होय. जें आर्थिक कोंडीचें धोरण योजिलेलें आहे त्यांत अंतिम परिणामकारक शक्तीचे गुण नाहींत हे सर्व मान्य करतील. म्हणून केवळ त्याच्या साहाय्यानें आम्ही आमचें साध्य सिद्ध करूंच शकूं किंवा समूहा–समूहांतील अथवा राष्ट्रा-राष्ट्रांतील विरोध नष्ट करूं शकूं अशी आशा बाळगणें म्हणजेच एकदां असफल ठरलेला 'उदारमतवाद' किंवा बुद्धिवाद आंतरराष्ट्रीयक्षेत्रांत पुनः जिवंत करण्यासारखेंच होईल !

## आंतरराष्ट्रीय व्यवहार आणि सत्याग्रह

म्हणून, आम्ही शस्त्र उचलणार नाहीं व तुम्हांला सत्याग्रह करूं देणार नाहीं अशी भूमिका भारत-सरकार घेईल तर ती प्रत्यक्षांत फार वेळ टिकण्यासारखी नाहीं, किंवा बुद्धीला पटण्यासारखीहि नाहीं. अर्थात् राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय आर्थिक आणि इतर शक्ती अशा रीतीनें काम करीत आहेत कीं त्यामुळें गोवा-मुक्ततेचा क्षण समीप येत आहे असें विश्वासपूर्वक पंडितजींनीं भारतीय जनतेला आश्वासन दिलें आहे. गोव्याचा प्रश्न एक लहान प्रश्न आहे व पोर्तुगालची शक्ति भारताच्या शक्तीच्या तुलनेनें अगण्य अशीच आहे. म्हणून पंडितजींच्या अपेक्षेप्रमाणें गोव्याचा प्रश्न भारतसरकार जे उपाय योजीत आहे तेवढ्यानें कदाचित् सुटेलहि. पण जरी यदाकदाचित् तो सुटला तरी गोव्याच्या निमित्तानें आमच्यापुढें व जगाच्यापुढें जी खरी समस्या उभी आहे ती ही कीं, आंतर-राष्ट्रीय हितविरोध बुद्धिवाद, निःशस्त्र प्रतिकार यांसारख्या तथाकथित शांततेच्या मार्गांनीं सुटणें अशक्य झालें तर युद्ध करावयाचें कीं नाहीं, नाहीं तर काय करावयाचें ? गांधीजींच्या मताप्रमाणें युद्धाला पर्याय म्हणून सत्याग्रहाचा उपयोग करावयाचा किंवा नाहीं ? दक्षिण आफ्रिकेंत हिंदी लोकांच्या स्वाभिमानाचें रक्षण करण्यासाठीं गांधीजींनीं प्रथम सत्याग्रहाचा उपयोग केला. त्या वेळीं दक्षिण आफ्रिकेचें सरकार व हिंदुस्थानचें सरकार हीं भिन्न असलीं तरी दोन्हीहि देश ब्रिटिश साम्राज्याचेच घटक असल्यामुळें दक्षिण आफ्रिकेंतील काय किंवा भारतांतील काय, सत्याग्रहाचा लढा हा एक घरगुती प्रश्न (domestic issue) होता असें एक प्रकारें म्हणतां येईल. पण गोवा हा भारताचें एक अविभाज्य अंग असला व गोव्याच्या स्वातंत्र्याचा संग्राम हा भारताच्याच स्वातंत्र्याचा लढा आहे असें मान्य केलें तरी गोव्यावर आज ज्या पोर्तुगालची राजकीय सत्ता आहे त्या पोर्तुगालचें सरकार व भारताचें आजचें सरकार दोन्हींहि सार्वभौम सरकारें (Sovereign States), आहेत ही गोष्ट आम्हाला अमान्य करतां येणार नाहीं. म्हणून गोव्याचा प्रश्न राष्ट्रांतर्गत नसून आंतरराष्ट्रीय आहे.

लोकशाही राज्यपद्धतींत सत्याग्रहाला स्थान नाहीं असें मत प्रदर्शित करणारी कांहीं मंडळी आज या देशांत आहेत. पण गांधीजींना हें मत केव्हांहि मान्य झालें नसतें, हें अगदीं उघड आहे. जेथें विरोध नष्ट करण्याचे बाकीचे सर्व मार्ग खुंटले तेथें सत्याग्रह हा मानवाचा धर्म आहे (the law of life) असें त्यांचें मत होतें. 'गांधीजी म्हणतात; : "हिंसा हा जसा पशूचा स्वभावधर्म आहे तसा अहिंसा हा माणसाचा स्वभावधर्म आहे." कुटुंबापासून केवळ राष्ट्रापर्यंतच नव्हे तर आंतरराष्ट्रीय व्यवहार ('विश्वचि माझें घर') हें सुद्धां सत्याग्रहाचें क्षेत्र आहे असें त्यांचें मत होतें. गांधीजी लिहितात : "माणसा-माणसांमधील व राष्ट्राराष्ट्रांमधील संबंधांत संपूर्ण अहिंसेचा उपयोग शक्य आहे असें माझें मत आहे व मी त्याचें समर्थन करतों." जर्मनीनें इंग्लंडवर चढाई केली तर त्याच्या विरुद्ध संपूर्ण अहिंसेचा उपयोग करावा असें दुसऱ्या जागतिक युद्धाच्यावेळीं गांधीजींनीं इंग्लंडला आवाहन केलें होतें; जपानच्या आक्रमणाला भारतानें अहिंसेनें तोंड द्यावें असें गांधीजींचें शेवटपर्यंत

म्हणणें होतें. पण सरकार म्हणजे शस्त्रधारी असें समीकरण असल्यामुळें सरकार व सत्याग्रह हा मुळीं अंतर्विरोधच आहे. मग अशा परिस्थितींत सरकार राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय प्रश्नांच्या बाबतींत लोकांना सत्याग्रह करण्याला मदत नसली तरी निदान परवानगी देणार कीं नाहीं ? प्रस्तुत लेखांत याच प्रश्नांचा म्हणजे आंतरराष्ट्रीय सत्याग्रहाचाच विचार करावयाचा आहे.

## सरकार आणि आंतरराष्ट्रीय सत्याग्रह

'आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत राष्ट्रीय लढ्याचें योग्य माध्यम सरकारच समजलें पाहिजे ' हें काँग्रेसचे अध्यक्ष श्री ढेबरभाई यांचें मत ग्राह्य धरलें तर आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत सत्याग्रहाला स्थानच राहात नाहीं. कारण, वर म्हटल्याप्रमाणें सरकार केव्हांहि सत्याग्रह करूं शकत नाहीं. पण श्री. कृपलानींच्या प्रमाणें अल्पकालांतच श्री. ढेबरभाईंच्या या विचारांतहि परिवर्तन झालें आहे असें ' टाईम्स ऑफ इंडिया'मधील ' The rationale of Satyagraha' ( ' सत्याग्रहाच्या मागील बुद्धिवादी उपपत्ति ' ) या लेखमालेंत आलेल्या त्यांच्या लेखावरून दिसतें. श्री. ढेबरभाई यानीं आपल्या या लेखात ज्या सरकारजवळ सैन्य आहे त्या सरकारचे प्रजाजन आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत सत्याग्रह करूं शकतील काय असा प्रश्न निर्माण केला आहे व त्याला स्वतःच असें उत्तर दिलें आहे कीं ही गोष्ट त्या वेळच्या परिस्थितीवर अवलंबून राहील व असा सत्याग्रह करावयाचा तर त्यासाठीं कांहीं अटी अगर पथ्यें पाळावीं लागतील. या प्रश्नाबाबत श्री. विनोबाजींचें म्हणून एक मत जाहीर झालें आहे. ज्या लोकांच्या सरकारापाशीं सैन्य आहे त्यांना तसेंच जवळ सैन्य असलेल्या दुसऱ्या देशाविरुद्ध सत्याग्रह करण्याचा नैतिक हक्क नाहीं, असें श्री. विनोबाजी म्हणतात. या मतामागील तर्कशुद्ध विचारसरणी काय आहे हें समजण्याला ती बातमी ज्या रीतीनें प्रसिद्ध झाली आहे त्यावरून मदत होत नाहीं. यावर एक-दोन विचार स्वाभाविकच सुचतात. भारतावर आक्रमण झालें तरच आपण शस्त्र उचलूं, इतर आंतरराष्ट्रीय व्यवहारांत शस्त्र वापरणार नाहीं अशी भारत-सरकारची प्रतिज्ञा आहे. याचा अर्थ आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील व्यवहाराबाबत तरी ज्यांच्या सरकाराजवळ शस्त्र नाहीं असेच भारतीय लोक आहेत असें मानणें उचित होणार नाहीं का ? व म्हणून गोव्याच्या सत्याग्रहांत हिंदी लोकांनीं भाग घेणें श्री. विनोबाजींच्या दृष्टीनेंहि समर्थनीय ठरत नाहीं का ? दुसरा विचार असा कीं ज्यांच्या सरकाराजवळ सैन्य आहे अशा लोकांना अहिंसेच्या व सत्याग्रहाच्या मार्गानें एकमेकांना मदत करतां येणार नाहीं का ? अशीं सरकारें युद्धाच्या प्रसंगीं तह-जन्य दोस्तीमुळें एकमेकांच्या मदतीला धावून जातात असा आजपर्यंतचा ऐतिहासिक व्यवहार आहे. मग एका देशाच्या शस्त्रधारी सरकारच्या विरुद्ध तेथील जनता सत्याग्रहानें लढत असेल तर तिच्या मदतीला दुसऱ्या देशांतील शस्त्रधारी सरकारच्या प्रजेपैकीं ज्यांचा सत्याग्रहावर विश्वास आहे असे लोक मदतीला गेले तर त्यांत त्याची कोणती चूक होईल ? उलट, त्यांतून सत्याग्रहावर श्रद्धा ठेवणाऱ्या जगांतील जनतेची एक जी संयुक्त फळी निर्माण होईल, ती निरनिराळ्या सरकारांना शस्त्रसंन्यास घेण्याला भाग पाडील अशीच परिस्थिति निर्माण होण्याचा संभव नाहीं का ?

कोणत्याहि कारणामुळें आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत शस्त्र व सत्याग्रह दोन्हीहीं वर्ज्य ठरलीं तर मग या क्षेत्रांत सरकारचा बुद्धिवाद व जास्तींत जास्त निःशस्त्र प्रतिकार हीं दोनच साधनें लोकापाशीं शिल्लक राहतात. पण या दोहोंच्या यशाबद्दल खात्री नाहीं. ' भारताचें परराष्ट्रीय धोरणः एक दृष्टिकोन ' या पूर्वनिर्दिष्ट लेखांत मीं म्हटलें होतें: " आजच्या युद्धामुळें शत्रु-मित्र व स्वतः अशा सर्वांचाच नाश होईल या भीतीनें किंवा युद्धानें आज कोणताच प्रश्न सुटणार नाहीं अथवा युद्धामुळें कोणाचेंच हित साधणार नाहीं, या बुद्धिवादानें मनुष्य व देश हिंसेचा त्याग करतीलच व युद्धापासून परावृत्त होतीलच असा विश्वास, आजच्या माणसाच्या मनोव्यापाराची प्रक्रिया लक्षांत घेतली तर, ठेवतां येत नाहीं. तसा विश्वास बाळगणें म्हणजे असफल झालेला ' उदारमतवाद ' किंवा बुद्धिवाद नव्यानें आन्तरराष्ट्रीय व्यवहारांत जिवंत करण्यासारखें होईल. केवळ बुद्धिवादानें मानवसमाजापुढील अनेक कठीण समस्या—विशेषतः युद्धासारखी समस्या—सुटत नाहीं असें एकदां सिद्ध झालें आहे. " अशा परिस्थितींत आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील लोक-कृतीच्या यशाच्या बाबतींत उत्पन्न झालेला हा पेंचप्रसंग सुटावयाचा कसा ?

## लोकप्रतिनिधींचा विश्वसंघ

जोंपर्यंत आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत सरकारद्वारां व्यवहार करण्याचें सोडून लोक स्वतंत्र रीतीनें वावरूं लागणार नाहींत तोंपर्यंत हा पेंचप्रसंग सुटण्याची आशा करणें व्यर्थ आहे. पहिल्या जागतिक युद्धाच्या अंतीं जन्माला आलेला राष्ट्रसंघ व दुसऱ्या जागतिक युद्धाच्या शेवटीं अस्तित्वांत आलेला संयुक्त राष्ट्रसंघ यांना जागतिक शांति-प्रस्थापनेच्या कामीं जें अपयश आलें त्याची जी कारणमीमांसा डॉ. आइन्स्टीन यांनीं युनेस्कोसाठीं १९५१ सालीं लिहिलेल्या एका लेखांत केली आहे ती बरीच उद्बोधक आहे. डॉ. आइन्स्टीननीं म्हटलें आहे कीं "या संयुक्त राष्ट्रसंघटना म्हणजे राष्ट्रीय सरकारांच्या प्रतिनिधींचीं मंडळें होत. स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीला पटेल त्याप्रमाणें स्वतंत्रपणें मत देणाऱ्या लोकांच्या प्रतिनिधींना या संघटनांत स्थान नाहीं." जोंपर्यंत ही स्थिति कायम आहे तोंपर्यंत राष्ट्रीय सरकारांचें जें अखेरचें बळ हिंसा तेंच या संयुक्त राष्ट्रसंघटनांचें बळ रहाणें अपरिहार्यच आहे. म्हणून जगांत शांति प्रस्थापित करावयाची तर लोकप्रतिनिधींचा विश्वसंघ ( Peoples' World Federation) स्थापन होणें जरूर आहे. आज माणसांमध्यें ज्या जातिनिष्ठा, धर्मनिष्ठा व राष्ट्रनिष्ठा आहेत त्या सर्व जाऊन त्यांच्या अंतःकरणांत एकमेव मानवनिष्ठा निर्माण होईल, तेव्हांच हें शक्य होईल. आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील सत्याग्रहच या मानवनिष्ठेला जन्म देऊं शकेल आणि तिचें पोषण करूं शकेल. कारण, मानवावरील प्रेम व श्रद्धा हेंच सत्याग्रहाचें आधारतत्त्व आहे. यासाठींच गोवा-सत्याग्रहाचें मानवाच्या भवितव्याच्या दृष्टीनें अपूर्व महत्त्व आहे. कारण गोवा-सत्याग्रह हा जगांतील आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील खरा पहिला सत्याग्रह आहे. म्हणून त्याविषयीं खोल विचार व चिंतन होणें जरूर आहे.

भारताच्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत सत्याग्रहाचें अमोघत्व सिद्ध झालें असलें तरी आंतरराष्ट्रीय विरोध शमविण्याचें साधन म्हणून आपण त्याचा प्रथमच प्रयोग करीत असल्यामुळें, त्या बाबतींत कोणतेंच मत आज निश्चित न समजतां आपण विचारपूर्वक प्रत्येक पाऊल टाकलें पाहिजे, हें पंडितजींचें म्हणणें सर्वांनाच मान्य होऊं शकेल.

## भारतीयांचा हक्क

पोर्तुगाल-सरकारविरुद्ध आपल्या स्वातंत्र्यासाठीं लढण्याच्या गोव्यांतील व गोव्याबाहेरील गोमंतकीयांच्या जन्मसिद्ध हक्काबद्दल भारतामध्यें तरी निदान कसलाहि मतभेद नाहीं. जेथें जगांतील सर्वच ठिकाणच्या वसाहतवादाला आमचा विरोध आहे, तेथें अगदीं तळहाताएवढ्या भारताच्या भागावर वसाहतवाद आम्हीं कसा सहन करूं ? गोव्याचा स्वातंत्र्याचा लढा सत्याग्रही लढा असावा असें आम्हाला वाटणें हें स्वाभाविक आहे व आमचे गोमंतकीय बंधु व भगिनी शांततेनेंच आपल्या स्वातंत्र्यासाठीं लढत आहेत. मतभेद असलाच तर तो गोव्याच्या स्वातंत्र्यासाठीं भारतीयांनीं काय करावें या प्रश्नावर आहे. आणि माझ्या मतें, या मतभेदाचें कारण स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाबद्दल कांहीं मंडळींच्या विचारांतील गोंधळ हें आहे. गोवा हा भारताचा अविभाज्य भाग असून गोवा स्वतंत्र झाला नाहीं तोंपर्यंत संपूर्ण भारत स्वतंत्र झाला असें मानण्याला कोणीहि भारतीय तयार नाहीं. असें जर आहे तर गोव्याच्या स्वातंत्र्याचा प्रश्न केवळ गोमंतकीयांच्या मतावर किंवा मर्जीवर सोंपविण्याला भारत कसा तयार होईल ? या स्थितींत गोव्याच्या स्वातंत्र्याच्या लढ्याची जबाबदारी प्राधान्यतः गोवेकरांची आहे व त्यांच्या लढ्याला मदत करणें एवढेंच भारतीयांचें काम आहे हें म्हणणें भावनेला तर नव्हेच पण बुद्धीलाहि पटण्यासारखें नाहीं. गोमंतकीय बंधु-भगिनींनीं स्वातंत्र्याचा लढा सुरूं केला तरच भारतीयांनीं मदतीच्या रूपानें त्यांत भाग घेणें समर्थनीय आहे अशी एकदां भूमिका घेतली, तर आम्ही गोव्यांतून पोर्तुगालची सत्ता नष्ट करणारच असें म्हणण्याचा भारत-सरकारला हक्क कसा प्राप्त होतो ? 'गोव्यांतून आम्ही पोर्तुगीज सत्ता नष्ट करणारच' या म्हणण्याचा तर्कशुद्ध अर्थ असाच कीं, गोमंतकीयांची इच्छा असो वा नसो, गोवा स्वतंत्र करण्याचा भारत-सरकारचा हक्क आहे. मग जो हक्क सरकारला आहे तो लोकांना नाहीं असें कसें म्हणतां येईल ? गोवा हा भारताचा अविभाज्य भाग आहे म्हणून त्याला स्वतंत्र करण्याचा आम्हाला हक्क आहे असें एकदां मानल्यावर गोवा स्वतंत्र झाल्यावर त्यानें भारतांत सामील व्हावयाचें कीं स्वतंत्र राहावयाचें हें गोमंतकीयांच्या मतावर अवलंबून







अनुक्रमणिका

आहे ह्या म्हणण्यांतहि कांहीं तर्कशुद्धता नाहीं. जो भारताचा अविभाज्य भाग तो भारताला पुनः जोडला जाणें किंवा न जाणें तेथील लोकांच्या मर्जीवर कसें अवलंबून राहूं शकतें ? माझ्या मतें, येथें स्वयं-निर्णयाला कांहीं स्थान असेल, तर स्वतंत्र झाल्यावर शेजारच्या कोणत्या प्रदेशांत सामील व्हावयाचें हें ठरविण्याचें स्वातंत्र्य गोमंतकीय बंधुभगिनींचें आहे, एवढेंच. या प्रकरणांत कांहीं लोकांच्या विचारांत जो गोंधळ उत्पन्न झाला आहे, त्याचें मुख्य कारण गोव्या-च्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत त्यांनीं भारतीय व गोमंत-कीय असें द्वैत मानलें आहे म्हणून.

पण शांततेच्या मार्गांनींच गोव्याचें स्वातंत्र्य संपादन करावयाचें असें सरकार व लोक या उभयतांनीं मान्य केलें तर या बाबतींत केवळ सरकारच्याच कामगिरीवर जर लोक विसंबून राहतील तर त्यांना यशाची खात्री नाहीं हें वर दाखविलेंच आहे. अशा स्थितींत गोव्याच्या स्वातंत्र्यासाठीं सुरूं झालेल्या सत्याग्रहाच्या लढ्यांत भाग घेण्याशिवाय भारतीयांपाशीं स्वतंत्र असा दुसरा कोणता मार्ग शिल्लक उरतो ? भारत व गोवा यांच्या मधील राजकीय विभक्तत्व ( ' अविभक्तं विभक्तेषु ' ) जसें गोवा स्वतंत्र करण्याच्या भारतसरकारच्या शांति-मय उपायांना बाध आणूं शकत नाहीं, तसेंच गोव्यांत जाऊन सत्याग्रह करण्याच्या भारतीयांच्या हक्काच्या आडहि तें येऊं शकत नाहीं. सत्याग्रहाचें तत्त्व सर्वव्यापी असल्यामुळें तें दिक्कालानें बाधित होऊं शकत नाहीं. म्हणून जेथें अन्याय आहे तेथें त्याचा सत्याग्रहानें प्रतिकार करण्याचा कोणालाहि, केव्हांहि व कोठेंहि हक्क आहे हें मान्य केलें पाहिजे. अर्थात् व्यवहाराचीं आणि शक्याशक्यतेचीं बंधनें विशिष्ट काळीं, विशिष्ट स्थळीं व विशिष्ट व्यक्तींना अथवा समूहानांच पडणें अपरिहार्य असलें तरी तीं सत्याग्रहाचीं बंधनें नव्हेत.

## गोवा-सत्याग्रहाचीं आवश्यक पथ्यें

गोवा – सत्याग्रहांत भाग घेण्याचा भारतीयांचा हक्क पंडितजींनीं मान्य केला आहे. तपशिलांत अजूनहि जी धरसोड होत आहे ती समजण्यासारखी आहे. सर्वांनाच हा प्रसंग नवीन आहे. म्हणून सर्वांनीं तिचा विचार करणें स्वाभाविक व जरूरहि आहे. गेल्या १५ ऑगस्टच्या बलिदानामागची अहिंसा ही शूरांची अहिंसा होती हें सर्व जगानें मान्य केलें आहे. गोव्याच्या स्वातंत्र्याचा हा आंतरराष्ट्रीय सत्याग्रहाचा लढा यशस्वी करून विश्वशांतीच्या प्रस्थापनेच्या पथावर भारतानें एक पाऊल पुढें टाकावयाचें तर, (१) हा लढा अखेरपर्यंत अहिंसात्मक राहील ही नीति सर्वांनीं मान्य केली पाहिजे. ( २ ) भारत-सरकारला पोलिस कारवाई करण्याला भाग पाडणें हा या सत्याग्रहाचा केव्हाहि हेतु असतां कामा नये. ( ३ ) त्याचप्रमाणें आपल्या रक्षणार्थ किंवा आपला होणारा छळ थांबविण्यासाठीं भारत-सरकारनें आपल्या शस्त्राचा नसला तरी निदान निःशस्त्र प्रतिकाराचा उपयोग जरूर करावा अशी इच्छा सत्याग्रहींनीं कदापि मनांत बाळगतां कामा नये. ( ४ ) भारतीय लोकमत प्रक्षुब्ध होऊन भारत सरकारला शस्त्र उचलणें अथवा तत्सम इतर कडक उपाय योजणें भाग पडेल असें वातावरण भारतांत निर्माण होईल अशा रीतीनें हा सत्याग्रह जसा चालविता कामा नये. त्याच प्रमाणें (५) ज्यामुळें गोव्यांतील व पोर्तुगाल मधील पोर्तुगीज लोक व त्यांचे प्रतिनिधी यांचा प्रक्षोभ होऊन ते अधिक अत्याचाराला प्रवृत्त व्हावेत या हेतूनेंहि हा सत्याग्रह चालवितां कामा नये. कारण, विरोधकाच्या मनांतील सात्त्विक भाव जागृत करून त्याला सत्कार्याला प्रवृत्त करणें हा सत्याग्रहाचा हेतु असला पाहिजे. सत्याग्रहाच्या मार्गानें जगांत शांति प्रस्थापित करणें हें भारताचें स्वभावसहज ऐतिहासिक कार्य आहे असें आज स्पष्ट झालें आहे. म्हणून त्यानें या कार्याच्या सिद्धीसाठीं सर्व जगाचा सहयोग मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. गोव्याच्या सत्याग्रहांत आतापर्यंत कोठेंहि हिंसा झालेली नाहीं. १५ ऑगस्टच्या शूरांच्या शुद्ध बलिदानानें जगाला हें दाखवून दिलें आहे कीं सत्याग्रहींच्या मनांत हिंसेचा लेशमात्रहि विचार नाहीं. गोव्याच्या या स्वातंत्र्याच्या लढ्यानें भारतीयांनीं सत्याग्रहाचा जगाला अल्पसा परिचय करून दिला आहे.

गोव्याच्या लढ्यानें सत्याग्रहाचें क्षेत्र आतां आंतर-राष्ट्रीय म्हणजे अधिक व्यापक केलें आहे. तथापि भार-ताला त्याचें सम्यक् ज्ञान झालें आहे असें म्हणतां येणार नाहीं. स्वतः भारतालाच सूक्ष्म बुद्धीनें त्याचा अभ्यास करून, शुद्ध चित्तानें आचरण करण्याची जरूरी आहे. तथापि, विश्वशांतीचा प्रश्न इतका गंभीर

व निकडीचा झाला आहे कीं समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें " जें जें आपणासि ठावें । तें तें दुसऱ्यासी शिकवावें । शहाणे करून सोडावे । सकळ जन " हीच नीति येथें भारतानें स्वीकारली पाहिजे. गोवा हा भारताचें अ-विभाज्य अंग असल्यामुळें गोवा स्वतंत्र झाल्याशिवाय भारताचें स्वातंत्र्य पूर्ण होत नाहीं, आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत केव्हांहि शस्त्र न वापरण्याची भारत-सरकारनें कशी प्रतिज्ञा केली आहे, भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याला शांततेची व सत्याग्रहाची कशी परंपरा आहे, या व दुसऱ्या अशाच प्रकारच्या गोष्टींची बाहेरच्या जगाला माहिती व ज्ञान देऊन ज्यांची ज्यांची गोव्याच्या सत्याग्रहाच्या लढ्यांत भाग घेण्याची इच्छा असेल त्या परदेशांतील लोकांना भाग घेतां येईल अशा रीतीनें गोव्याचा सत्याग्रह चालविला पाहिजे.

गोव्याचा सत्याग्रह म्हणजे भारतीय लोकांनीं गोव्यावर केलेलें एक शांतिमय असलें तरी तें आक्रमणच आहे असें प्रामाणिकपणें मानणारे परदेशांत पुष्कळ लोक आहेत. जगांतील वसाहतवाद टिकविण्यांत ज्यांचें हित आहे असे कांहीं लोक यांत आहेत असें यावर कोणी म्हणेल तर तें खरें आहे. इंग्लंड व फ्रान्स यांनीं भारतांतील आपला वसाहतवादाचा अग्नि विझविला असला तरी तो त्यांच्या शुद्ध हृदय-परिवर्तनाचा परिणाम नव्हे हें मान्य केलें पाहिजे. कारण हीं दोन्हींहि राष्ट्रें जगांत इतरत्र असलेल्या त्यांच्या वसाहती व अंकित देश आपल्या ताब्यांत ठेवण्यासाठीं सर्व प्रकारचे हिंसात्मक उपाय अमलांत आणीत आहेत. अमेरिकन लोकांचें मानस वसाहतवादानें तितकें मलिन झालेलें नसलें तरी गोवा-सत्याग्रह व विशेषतः गेल्या १५ ऑगस्टच्या घटनेची सर्वसामान्य अमेरिकन नागरिकांवर जी प्रतिक्रिया झालेली दिसते तीवरून अमेरिकन मनहि तितकेंसें निर्मळ नाहीं असें कबूल केलें पाहिजे. अशा स्थितींत ' आमचा हेतु शुद्ध आहे, मग इतरांचा आपल्या कृतीबद्दल गैरसमज झाला तर त्यांत आमचा काय दोष ? व आम्ही तिकडे कां लक्ष द्यावें ? ' असें म्हणणें कोणाच्याहि हिताचें नाहीं. सत्याग्रहींच्या तर सुतराम् नाहीं ! कारण सत्याग्रहींचें यश अखेर लोकमत-परिवर्तनावरच अवलंबून असतें. गोवा-सत्याग्रह आंतरराष्ट्रीय सत्याग्रह असल्यामुळें त्याचें यशापयश आंतरराष्ट्रीय लोकमतावर फार अवलंबून आहे, ही गोष्ट गोवा-सत्याग्रहाचें नेतृत्व करणाऱ्यांनीं लक्षांत घेतली पाहिजे. भारत-सरकारनें गोवा-सत्याग्रहाबाबत सध्या जें धोरण अवलंबिलें आहे त्याचा उपयोग जागतिक लोकमत जागृत व सुशिक्षित करण्यासाठीं करून घेणें सूज्ञ-पणाचें होईल असें मला वाटतें. आर्थिक कोंडी किंवा प्रतिस्पर्ध्याचें नुकसान करणारे व त्याला कष्ट देणारे तत्सम उपाय सत्याग्रहाच्या दृष्टीनें उपकारक नसल्यामुळें ते वांछनीय नाहीत. कारण, निःशस्त्र प्रतिकार व सत्याग्रह यांच्यामध्यें मोठा भेद आहे. तो हा कीं, पहिल्याला प्रतिपक्षाचें नुकसान करणें व त्याला क्लेश देणें अभिप्रेत आहे, तर दुसऱ्याला त्याचें पथ्य आहे. सत्याग्रही स्वतः नुकसान सहन करतो व आत्मक्लेश भोगतो.

## आंतरराष्ट्रीय स्वतंत्र लोकयंत्रणेची जरूरी

जागतिक लोकमत शिक्षित करून जगांतील लोकांचे झालेले गैरसमज दूर करावयाचे व त्यांना गोव्याच्या मागणीची न्याय्यता पटवून देऊन जरूर तर सत्याग्रहाला त्यांचा सक्रिय नैतिक पाठिंबा मिळवावयाचा, तर हें काम लोकांनीं भारत-सरकारवर टाकतां कामा नये. हें व शांतिकालांतील अशीं दुसरीं कामें करण्याचें सरकारचें एकमेव साधन म्हणजे परदेशांतील वकिलाती होत. पण या सरकारी वकिलातींना लोकांनीं परदेशांतील लोकशिक्षणाचें काम करण्याकरितां आपलें साधन करूं नये. त्यासाठीं लोकांनीं निरनिराळ्या देशांत आपलीं प्रतिनिधिमंडळें पाठवावींत व या कामासाठीं जरूर तर स्वतंत्र लोक-यंत्रणा निर्माण करावी. या यंत्रणेंत लोकांच्या जागतिक संयुक्त लोक-संघाचीं बीजें साठविलेलीं असून जागतिक निःशस्त्री-करणाचा व विश्वशांतीचा हा एकमेव मार्ग आहे असें मला वाटतें. लोकांच्या या प्रयत्नांना भारत-सरकारकडून मदत मिळाली पाहिजे. कारण, भारताच्या परराष्ट्रीय धोरणाच्या मागें राष्ट्राची अहिंसाशक्ति उभी राहील तरच तें सफल होईल हें पंडितजीहि मान्य करतील असा मला विश्वास वाटतो. देशांदेशांतील वादग्रस्त प्रश्न शांततायुक्त मार्गानें सोडविण्याचें एक साधन व युद्धाला पर्याय म्हणून सत्याग्रहाचा पुरस्कार भारत-सरकार व त्याचे सर्व ठिकाणचे प्रतिनिधी यांनीं करण्याचा काल लवकरच येईल अशी माझी श्रद्धा आहे.










श्री. स. आ. सप्रे

# प्रा. दीक्षित आणि बुद्धिप्रामाण्यवाद

'नवभारता'च्या सेप्टेंबर १९५५ च्या अंकांत प्रा. **श्रीनिवास दीक्षित** यांचा '**बुद्धिप्रामाण्यवादाची संदोषता**' हा लेख वाचून अनेक प्रश्न मनांत येतात. **बर्ट्रंड् रसेल** हा बुद्धिवाद्यांचा प्रातिनिधिक तत्त्ववेत्ता असें मानून त्यांनीं आपला लेख लिहिला हें विवेचनाच्या दृष्टीनें सोयीचेंच झालें आहे. परंतु प्रथमदर्शनीं अशी शंका येते कीं प्रा. दीक्षितांचा रसेलच्या विचारसरणीशीं नीट परिचय तर नसावा ना! आपल्या लेखाच्या पहिल्याच परिच्छेदांत दीक्षित लिहितात: "भावनेनें बुद्धीचें आधिपत्य मानलें पाहिजे इतकेंच आम्ही ( म्ह. बुद्धिवादी ) म्हणतों." हें रसेलच्या विचारसरणीच्या अगदीं विरुद्ध आहे. रसेलनें आपल्या 'Human Society in Ethics and Politics' या ग्रंथांत म्हटलें आहे : "एक सुप्रसिद्ध वाक्य असें आहे 'बुद्धि ही भावनांची गुलाम आहे व तसेंच तिनें असलेंहि पाहिजे'. डेव्हिड ह्यूमचें हें वाक्य आहे. या वाक्यांत व्यक्त झालेली विचारसरणी मला पूर्णपणें संमत आहे व ती कोणाहि समंजसपणें वागणाऱ्या मनुष्याला संमत होईल.[1]"

प्रा. दीक्षितांचा लेख वाचून रसेलनें आपल्या टीकाकारांविरुद्ध त्याच ग्रंथांत केलेली तक्रार खरी वाटूं लागते. तो म्हणतो : "माझ्यावर दोषारोप करण्याची टीकाकारांना संवयच लागून गेली आहे. याचाच अर्थ असा कीं, ते माझ्या लेखाकडे दृढ पूर्वग्रहांतून बघतात. इतकें कीं मी जें खरोखरीं लिहिलें आहे तें त्यांच्या दृष्टीआड होतें." (पृ. ८)

दीक्षितांच्या लेखाचा विचार करतांना खालील गोष्टी तपासाव्या लागतात: (१) बुद्धिवाद्यांची (पर्यायानें, रसेलची) भूमिका त्यांनीं बरोबर मांडली आहे का? (२) बुद्धिवाद्यांच्या भूमिकेवर त्यांनीं केलेली टीका तर्कशुद्ध आहे का? (३) त्यांची स्वतःची नीति-शास्त्र-मीमांसा अंतर्गत तर्कशुद्धतेच्या कसोटीस उतरते का? (४) त्यांनीं ज्या जीवननिष्ठेचें अस्पष्ट दर्शन करून देण्याचा प्रयत्न केला आहे, ती जीवननिष्ठा आपल्या भावनांचें समाधान करूं शकते का?

वरील प्रश्नांपैकीं पहिला प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. कारण बुद्धिवाद्यांची भूमिकाच जर चुकीची मांडली तर त्यावरील टीकेस कांहींच अर्थ रहात नाहीं. दीक्षितांच्या लेखाची अवस्था थोडीबहुत तशीच झाली आहे, असें म्हणणें प्राप्त होतें. दीक्षितांचा लेख अंतिम मूल्यासंबंधी आहे. आपल्या लेखाच्या शेवटीं प्रा. दीक्षितांनीं सर्वांत महत्त्वाचा निर्णय सांगितला आहे, तो असा: 'जीवनमूल्यांचा साक्षात्कार बुद्धीस होत नाहीं.' पण जीवन-मूल्यांचा साक्षात्कार बुद्धीस होतो असें बुद्धिवादीहि मानीत नाहींत. रसेलचें दीक्षितांनींच उद्धृत केलेलें वाक्य असें आहे: ध्येयांची निवड करतांना बुद्धीचा कांहीं संबंध येत नाहीं. ['It (Reason) has nothing to do with the choice of ends.'] ॲरिस्टॉटलचें एक सुप्रसिद्ध वचन असें आहे कीं, "आपण ध्येयें काय असावीं याबद्दल विचार करीत नाहीं, तर ती ध्येयें साध्य करायला साधनें कोणतीं याचा विचार करतों." ( we deliberate not about ends but about the means to ends"). बुद्धिवाद्यांची भूमिका अशीच आहे. त्यामुळें जीवन-मूल्यें बुद्धिद्वारां प्रतीत होत नाहींत हें सांगण्याकरितां दीक्षितांनीं खर्चीं घातलेले परिच्छेद अप्रस्तुत आहेत.

रसेलच्या 'Human Society in Ethics

(1) "There is a famous sentence : 'Reason is and ought only to be, the slave of the passions' ...... It comes from David Hume. It expresses a view to which, I, like every man who attempts to be reasonable, fully subscribe." पान ८







and Politics ' या ग्रंथातील विचारसरणीवर दीक्षितांनीं कांहीं टीका केली आहे. याबाबत विचार करतांना दोन गोष्टी पाहाव्या लागतात. पहिली गोष्ट अशी कीं, रसेल ज्या कांटेकोर पद्धतीनें विचार करतो तदनुसार रसेलच्या मुख्य मुद्यांचा सारांश दीक्षितांनीं बरोबर सांगितला आहे कां ? दुसरी गोष्ट अशी कीं, दीक्षितांनीं रसेलची भूमिका बरोबर सांगितली असल्यास, त्यावरील टीका कितपत बरोबर आहे ? प्रा. दीक्षितांनीं रसेलचे म्हणून खालील विचार सांगितले आहेत व त्या अनुरोधानें टीका केली आहे.

( अ ) रसेलचें म्हणणें असें कीं व्यक्तीच्या ज्या निरनिराळया ऊर्मि आणि इच्छा असतात, त्यांची पूर्ति होणें हेंच त्या व्यक्तीचें कल्याण होय.

यावर दीक्षितांची टीका अशी कीं कांहीं जणांना दुसऱ्यांना क्लेश द्यावेत, छळ करावा अशी इच्छा असते. कांहींना मद्य पिऊन तर्र व्हावें अशी इच्छा असते. अशा तऱ्हेच्या सर्व प्रकारच्या वासनांच्या पूर्तीनें जीवन सफल होईल काय ?

रसेलनें केलेलें इच्छांचें वर्गीकरण व तदनुसार काढलेले निष्कर्ष यांकडे दुर्लक्ष केल्यानें वरील प्रकारची टीका झाली आहे. रसेल म्हणतो : " जेथें दोन्हीहि इच्छांची पूर्ति होणें शक्य असेल तेथें त्या दोन्हीं इच्छांना आपण सुसंगत व शक्य म्हणूं या. जेथें एका इच्छेची पूर्ति दुसऱ्या इच्छेच्या पूर्तीशीं विसंगत असेल तेथें त्या दोन्ही इच्छा ' विरोधी ' होत. ज्या जगांत निरनिराळया व्यक्ती किंवा समाज यांच्या इच्छा परस्परांशीं सुसंगत व शक्य रहातील तें जग, ज्यांत त्या इच्छा परस्परांशीं संघर्ष पावतात त्यापेक्षां अधिक सुखी होण्याचा संभव आहे[2]. "

( ब ) ' व्यक्तीच्या वासना त्या जशा आहेत तशा प्रमाण मानून त्यांची जास्तींत जास्त पूर्ति म्हणजेच व्यक्तीचें कल्याण असा पक्ष बुद्धिप्रामाण्यवाद्यास घ्यावा लागतो, रसेलच्या लिखाणांत अशा प्रकारच्या अनुमानास काय आधार आहे हें कळणें दुष्कर आहे. कारण रसेल तर वरील ग्रंथाच्या ' From Ethics to Politics ' या प्रकरणाच्या प्रारंभीं अत्यन्त सुस्पष्टपणें लिहितो : ( पान १५५ ).

" माणसाच्या वासना या कांहीं कायमच्या न बदलणाऱ्या नसतात. परिस्थिति, शिक्षण, संधि यांमुळें त्यांच्यावर परिणाम होतच असतो. वैज्ञानिक प्रगतीमुळें आज जें आपणांस कौशल्य लाभलें आहे तें कौशल्य उपयोगांत आणल्यास, त्याचप्रमाणें अर्थशास्त्रज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ यांनीं संपादिलेल्या ज्ञानाचा प्रसार केल्यास, माणसाच्या इच्छावासनांमध्यें ज्या इच्छा-वासना अधिक अपायकारक असतील त्या कमी करतां येतील. एखादा माणूस खाजगी खून करायला ज्या विकारामुळें प्रवृत्त होतो त्या विकाराएवढेंच मर्यादित महत्त्व, तेवढीच किंमत त्या वासनांना राहील. "

( क ) ' एक वासना बुद्धिप्रामाण्यवाद्यास दुसऱ्या कुठल्याहि वासनेइतकीच मोलाची ' ... ' मद्यप्याची बेहोष होऊन पडण्याची इच्छा व रसेलची गणितांतील कूटसमस्या सोडविण्याची इच्छा या वासना म्हणून एकाच तोलाच्या – हें कुणास पटेल ? ' असें प्रा. दीक्षित विचारतात. त्यांनीं आपल्या या आरोपाच्या समर्थनार्थ रसेलचें एक अवतरण दिलें आहे. हें अवतरण देण्यांत व त्यांतून कांहीं निष्कर्ष काढण्यांत गफलत झाली आहे. पहिली गोष्ट ही कीं, रसेल स्वतः सर्व वासना सारख्या मानीत नाहीं. तो म्हणतो : " सुखांच्या उत्कटतेवरून आपण सुखांची किंमत ठरवीत नाहीं. कांहीं सुखें इतरांपेक्षां आपल्याला जास्तच हवीशीं वाटतात[3]. "

(2) "Borrowing a term from Leibnitz's account of possible worlds, we may call two desires or impulses ' compossible ', when both can be satisfied, and ' conflicting ' when the satisfaction of the one is incompatible with that of the other ....... It is obvious that a world in which the aims of different individuals or groups are compossible is likely to be happier than the one in which they are conflicting " ( पान. १९ )

(3) " I do not think, however, that pleasure is quite the nearest that we can come to the common quality of the great majority of approved










रसेलनें मद्यप्याचें उदाहरण ( 'Intrinsic value is logically prior to value as means' ) 'मूल्य हें स्वयंसिद्ध व मूल्य हें साधन या दोहोंमध्यें स्वयंसिद्ध मूल्य हें तर्कदृष्ट्या अगोदरचें होय, हा मुद्दा स्पष्ट करण्याकरितां दिलें आहे या गोष्टीकडे, दीक्षितांचें दुर्लक्ष झालें असावें असें दिसतें. ज्या मद्यपानापासून मद्यपी व्यक्तीस अपाय होत नाहीं किंवा इतरांनाहि कोणत्याहि प्रकारें उपसर्ग पोहचत नाहीं, त्या व्यक्तीस अशा मद्यपानापासून होणारा आनंद त्याज्य कां मानावा ?– या विचारसरणीमागें, माझ्या मतें, उदात्त भावना आहे. ती उदात्त भावना कँटच्या ( 'Every human being is an end in himself' ) ' प्रत्येक मनुष्य हा स्वयमेव साध्य होय ' या वचनांत व्यक्त झालेली आहे.

वरील परिच्छेदांतून दीक्षित यांनीं रसेलच्या नीतिशास्त्रविषयक भूमिकेवर केलेलें भाष्य चुकीचें कसें आहे हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. दीक्षित यांच्या विचारांत अंतर्गत तर्कसंगति आहे कीं काय हें आतां पहावयाचें आहे. दीक्षितांच्या लेखाचा विषय नीति-शास्त्रविषयक आहे असें म्हणतां येईल. नीति-शास्त्र आणि शास्त्रें ( sciences ) यांमध्यें एक मूलभूत फरक आहे. नीतिशास्त्रांचा मूलभूत विषय म्हणजे भावना व विकार होत, इन्द्रियज्ञान नव्हे. ( ' Ethics differs from science in the fact that its fundamental data are feelings and emotions, not percepts'). हा मूलभूत फरक लक्ष्यांत न घेतल्यानें लेखाच्या प्रारंभीं बुद्धीचा कमीपणा दाखविणारीं कांहीं गैरलागू उदाहरणें त्यांनीं दिलीं आहेत. शास्त्रीय ज्ञान फक्त बुद्धीनें मिळतें असें कोणीच म्हणत नाहीं. प्रयोग व निरीक्षण यांचें शास्त्रांत अत्यन्त महत्त्वाचें स्थान आहे हें आतां सर्वमान्य आहे. दारूबंदी किंवा भूदान यांचें उदाहरण देण्यांत दीक्षितांचा उद्देश काय तो कळणें मुष्कील आहे. भूदान किंवा दारुबंदी यांच्या अंतिम उद्दिष्टाबद्दल मतभेद नाहीं. मतभेद आहे तो तीं उद्दिष्टें भूदान किंवा दारुबंदी यांनीं साध्य होतील का याबाबत प्रश्न साधनांचा आहे. समजा, भूदानामुळें धान्योत्पादन कमी झालें, शेतकरी अधिक निकृष्टावस्थेस पोहोचले तर भूदान-चळवळ अयशस्वी झाली म्हणण्यांत काय चूक आहे ?

दीक्षितांचा मूलभूत सिद्धांत असा कीं साऱ्या वासना भौतिक आहेत; कर्तव्य-प्रेरणा मात्र अभौतिक आहे; वासना निम्नगामी असतात; कर्तव्यप्रेरणा ऊर्ध्वगामी असते. लेखाच्या पूर्वार्धांत दीक्षित रसेलवर टीका करतांना लिहितात : " पूर्वग्रहशून्य सर्वसामान्य माणूस वासनावासनांत फरक करतोच. कांहीं वासना स्वभावतःच तामस, कांहीं स्वभावतःच राजस, व कांहीं स्वभावतःच सात्त्विक असतात " सर्व वासना निम्नगामी असतात या सिद्धांताशीं या विधानांचा समन्वय कसा करावा हें कोडेंच आहे. वर दीक्षितांनीं पूर्वग्रहशून्य सर्वसामान्य माणसाचा हवाला दिला. पण थोड्याच अवधीनंतर त्या लेखांत ते सांगतात कीं संस्कारी जीवन जगण्याकरितां कांहीं वासनांचा मूलतःच अशुभ म्हणून त्यांचा त्याग करावा लागतो. यावरून असें दिसतें कीं कोणत्या भावना मूलतः अशुभ हें संस्कारावर अवलंबून आहे. संस्कार आणि पूर्वग्रहशून्यता यांची सांगड घालणें कठिण आहे.

" कर्तव्यप्रेरणा ऊर्ध्वगामी आहे. ती अभौतिक आहे. अभौतिक अशा कर्तव्यप्रेरणेचा आश्रय आत्मा होय. आत्म्यास कल्याणाची चिरंतन ओढ लागलेली असते. " दीक्षितांच्या या वर्णनांतून अनंत प्रश्न निर्माण होतात. परंतु एकच प्रश्न प्रामुख्यानें विचारावासा वाटतो. तो असा कीं सर्व व्यक्तींच्या कर्तव्यप्रेरणा, दीक्षितांची विचारसरणी बरोबर असेल तर, साधारण सारख्या असावयास हव्या. स्टॅलिन व हिट्लर यांच्या कर्तव्यप्रेरणा अशा होत्या का ? कँट व नीत्शे यांना प्रतीत होणारीं जीवनमूल्यें एकच होतीं काय ?

इच्छा व ऊर्मि यांचें मानवी जीवनांत स्थान काय यांचें प्रा. दीक्षितांना नीटसें आकलन तर झालें नसावें ना अशी एक शंका येते. कोणत्याहि क्रियेच्या

actions. I think we must include such things as intelligence and aesthetic sensibility ... ... We do not, in fact, value pleasures in proportion to their intensity; some pleasures seem to us inherently preferable to others. " ( पान ११७ ).







मागें इच्छा ( किंवा ऊर्मि ) असतेच. कर्तव्यरत होण्याची इच्छा असल्याखेरीज कर्तव्याची जाणीव असूनहि व्यक्तीच्या हातून कांहीं होणार नाहीं. रसेल म्हणतोः " माणसांचे सर्वच व्यवहार इच्छा किंवा ऊर्मीनें प्रेरित असतात. कांहीं नीतिवादी मोठ्या कळकळीनें प्रतिपादन करीत असतात कीं कर्तव्यासाठीं किंवा नैतिक तत्त्वाप्रीत्यर्थ मूळ इच्छेचा प्रतिकार करणें शक्य आहे. पण त्यांचा हा भ्रम आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं, कोणीच मनुष्य कर्तव्यबुद्धीनें काम करीत नाहीं. मी कर्तव्य करावें अशी इच्छा असल्याशिवाय कर्तव्यबुद्धि माणसावर आपलें वर्चस्व गाजवूं शकत नाहीं. " ( पान १६० ). बुद्धिवाद्यांना भावनांचें महत्त्व कळत नाहीं असा आक्षेप सर्वसामान्य आहे. परंतु खरा बुद्धिवादी हें जाणून आहे कीं सत्य जाणण्याची तीव्र इच्छा असल्याखेरीज विचारचक्र कामच करणार नाहीं. शॉनें हें एके ठिकाणीं आकर्षकपणें सांगितलें आहेः ' Thought is always wishful, and cannot occur until a wish prompts it ' ( ' विचार हा नेहमींच मनोरथ-प्रेरित असतो. इच्छेनें प्रेरित झाल्याशिवाय विचार होत नाहीं ' ) ( ' Everybody's Political What is What ' पृष्ठ 316 ). सार्‍या वासना निम्नगामी असें म्हटलें कीं सार्‍या क्रिया ( व विचारहि ) निम्नगामी ठरतात.

दीक्षितांच्या लिखाणांत अंतर्गत तर्कसंगति कितपत आहे हें पहाण्याचा वर प्रयत्न केला आहे. आतां दीक्षितांनीं ज्या जीवननिष्ठेचें अस्पष्ट दर्शन करून देण्याचा प्रयत्न केला आहे ती जीवननिष्ठा आपल्या भावनांना आकृष्ट कितपत करते तें पहावयाचें. "ज्यानें जीवन प्रसन्न होतें, वृत्ती स्थिर होतात, असमाधान, हुरहूर यांचें नांवहि उरत नाहीं तो अनुभव सर्वस्वीं प्रमाण. " अशी समाधानी वृत्ति असणारा पुरुष सद्यःकालीं हिमालयाच्या उच्च शिखरांवरच असणें शक्य दिसतें ! कारण, त्यांस हायड्रोजन बॉम्बमुळें मानवजात निःशेष होईल ही भीति नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्यहीं ज्ञान वाढत आहे आणि आपण अज्ञानी आहोंत ही भावनाहि अस्वस्थ करीत नाहीं. असमाधान, हुरहूर यांचा अभाव हीच आदर्श अवस्था होय, असें दीक्षितांचें म्हणणें दिसतें. मानवजातीच्या भवितव्याबद्दल व्यक्ति चिंताक्रांत होऊं शकेल, आपल्या अज्ञानाच्या जाणीवेनें तिचें मन सतत अस्वस्थ असूं शकेल याची दीक्षितांना जाणीव दिसत नाहीं. दीक्षितांनीं ज्या आदर्श अवस्थेचें वर्णन केलें आहे ती अवस्था गतिशून्य जीवन-शून्य भासते. गतिशून्य जीवन अत्यंत कंटाळवाणें, अर्थशून्य होईल. मन प्रसन्नच रहावयाचें असेल तर तें क्रियाशीलच असलें पाहिजे. मनुष्याचें वैशिष्ट्य बुद्धींत आहे. विचारांत निमग्न असणें ही क्रिया सर्वश्रेष्ठ. आणि जर वैचारिक क्रिया सतत चालू रहावयाची असेल तर मनामध्यें आपल्या स्वतःच्या अज्ञानाबद्दल असंतोष असला पाहिजे; सत्य जाणण्याची तळमळ व हुरहुर असली पाहिजे. व्हाइटहेडच्या शब्दांत सांगायचें म्हणजे : ' Culture is activity of thought, and receptiveness to beauty and human feeling ' " संस्कृति म्हणजे विचारक्रिया, व सौन्दर्यग्रहणाकडे आणि मानवी भावनानुभूतीकडे प्रवृत्ति. " जीवनांतील सर्वश्रेष्ठ मूल्यें वरील छोटया वाक्यांत सांगितलीं आहेत.

असो. शेवटी कांहीं गोष्टींचा निर्देश करणें आवश्यक आहे. पहिली अशी कीं प्रस्तुत लेख एक सर्वसामान्य वाचक या नात्यानें लिहिला आहे. प्रस्तुत लेखकाचा तत्त्वज्ञान हा नित्य अभ्यासाचा विषय नाहीं. दुसरी गोष्ट ही कीं या लेखाचें स्वरूप नकारात्मक आहे. त्याचा मुख्य उद्देश रसेलवर दीक्षितांनीं केलेली टीका चुकीची ( factually incorrect ) आहे कीं काय ही शंका पुढें मांडणें हा आहे. रसेलचें लिखाण एक प्रकारें फसवें आहे. त्यांची लेखनशैली अत्यंत आकर्षक आहे. त्यामुळें त्यांतील गणिती पद्धत लक्षांत येत नाहीं. त्याचे ग्रंथ अत्यंत सुलभ वाटण्याचा संभव असतो. वस्तुतः ते तितके सुलभ नसतात. प्रा. दीक्षितांना रसेलच्या नीतिशास्त्रविषयक विचारांवर टीका करावयाची असेल तर ती निराळ्या पद्धतीनें करावी लागेल असें वाटतें.

---






प्रा. सुरेश म. डोळके

# ‘विवेकसिंधू’चा कालनिर्णय : २ :

गेल्या लेखांत[1] ‘विवेकसिंधूं’तल्या कालनिदर्शक उल्लेखांतील शक-संवत्सरांचा मेळ जुळविण्याची एक दिशा दाखविली. त्या पद्धतीनुसार केवळ ‘विवेकसिंधू-’तीलच नव्हे, तर डॉ. कोलते यांनीं चक्रधरांच्या कालनिर्णयाच्या दृष्टीनें ‘अशास्त्रीय’ व ‘अनुपयोगी’ ठरविलेल्या महानुभावीय पोथ्या, हरीबास व सोंगोबास यांचें ‘अन्वयस्थळ’, कांहीं ताम्रपट व शिलालेख यांतीलहि शक-संवत्सरांचा मेळ जुळवून दाखविला. प्रस्तुत लेखांत वराहमिहिरांच्या कालमापनात्मक गणिताचा प्रामुख्यानें ऊहापोह करून गेल्या लेखांतल्या उदाहरणांतील कालोल्लेख तपासून पहावयाचे आहेत.

**वराहमिहिराची रीति**

शालिवाहन शकावरून बार्हस्पत्य संवत्सर काढण्याची रीति वराहमिहिरानें पुढीलप्रमाणें दिली आहे. :

“ गतानि वर्षाणि शकेन्द्रकाला –
 द्धतानि रुद्रैर्गुणयेच्चतुर्भिः ।
नवाष्टपञ्चाष्टयुतानि कृत्वा
 विभाजयेच्छून्यशरागरामैः ॥
लब्धेन युक्तं शकभूपकालं
 संशोध्य षष्ट्या विषयैर्विभज्य ।
युगानि नारायणपूर्वकाणि
 लब्धानि शेषाः क्रमशः समाः स्युः ” ॥
[ ‘बृहत्संहिता’, अ. ८, श्लो. २०,२१ ]

म्हणजे, शालिवाहन शकाच्या गतवर्षास ४४ नें गुणावें. या गुणाकारांत ८५८९ मिळवून जी बेरीज येईल, तिला ३७५० नें भागावें. भागाकारांत शकाचीं गतवर्षें मिळवावीं व आलेल्या बेरजेस ६० नें भागावें.... जी बाकी राहील तो आकडा प्रभवादि-संवत्सरांच्या गतवर्षाचा निदर्शक होयें[2]. अर्थात्, त्यामध्यें आणखी १ मिळविल्यास, तो चालू संवत्सर होईल........

या रीतीनुसार गेल्या लेखांतल्या व इतरहि उदाहरणांतील शक-संवत्सरें तपासून पाहावयाचीं.

**( १ ) शके ४४०, ‘ जय ’ संवत्सर – [ वराह-मिहिराचा जन्मशक[3] ]**

४३९ × ४४ = १९३१६
१९३१६ + ८५८९ = २७९०५
२७९०५ ÷ ३७५० = $७\frac{१६५५}{३७५०}$
७ + ४३९ = ४४६
४४६ ÷ ६० शेष = २६ ( गतशकाचा संवत्सर क्रमांक )
२६ + १ = २७

म्हणजे, शके ४४० मध्यें २७ वा ( विजय ) संवत्सर येईल पण, ‘ विजय ’ संवत्सर उलटून गेल्या-नंतर बाकी राहिलेल्या $\frac{१६५५ + ४४}{३७५०}$ गुरुवर्षांत

१ ‘ नवभारत ’ ऑगस्ट १९५५.

२ वराहमिहिरानें सांगितलेल्या या गुरुवर्षांपेक्षां आर्यभटाच्या सूर्यसिद्धान्तानुसार येणारीं गुरूचीं वर्षें जास्त आहेत. वराहमिहिरानें ‘ पंचसिद्धान्तिकें’त ( एका महायुगांत ) गुरूचे भगण ३६४२० मानले असले, ( पं. सि., अ. १६, श्लो. २ ) तरी मूलसूर्यसिद्धान्तानुसारी जें ‘ भास्वतीकरण ’, त्यांतील गुरुक्षेपक, गुरुभगण ३६४२२४ धरूनच मिळतो. वराहमिहिरानें बार्हस्पत्य संवत्सर काढण्याची जी रीति सांगितली आहे, तीहि गुरुभगण ३६४२२४ घेऊनच मिळते.

३ ‘ कुतूहलमंजरी ’. ‘ भारतीय ज्योतिःशास्त्र ’ ( दीक्षित ) पृ. २१३ वरील तळटीप.

४ R. Sewell यांच्या प्रथम आर्यसिद्धान्तानुसारहि ( मध्यम राशिपद्धति ) शके ४४० मध्यें ‘विजय’ संवत्सर येतो. Epigraphia Indica, Vol. XVII, P. 26.

त्याच्या पुढला ( २८ वा ) ' जय ' संवत्सर राहील. अर्थात् शके ४४० त ' जय ' संवत्सर राहीलच.[५]

$\therefore$ शके ४४० = $\frac{२०९५}{३७५०}$ ' विजय ' + $\frac{१६९९}{३७५०}$

' जय ' = ( $१\frac{४४}{३७५०}$ गुरुवर्षे )

### ( २ ) शके ७२६, ' सुभानु ' संवत्सर–

### [ राष्ट्रकूट तिसरा गोविंद याचा ताम्रपट[६] ]

७२५ × ४४ = ३१९००

३१९०० + ८५८९ = ४०४८९

४०४८९ ÷ ३७५० = $१०\frac{२९८९}{३७५०}$

१० + ७२५ = ७३५

७३५ ÷ ६० शेष = १५

१५ + १ = १६

शके ७२६ मध्यें १६ वें ( ' चित्रभानु ' ) संवत्सर येईल.[७] पण, शके ७२६ च्या सुरुवातीचा $\frac{७६१}{३७५०}$ भाग लोटून ' चित्रभानु ' पूर्ण झाल्यानंतर उरलेल्या $\frac{२९८९}{३७५०}$ वर्षांत ( $\frac{२९८९ + ४४}{३७५०}$ गुरु वर्षांत ) १७ वें, ' सुभानु ' संवत्सर राहील.

---

५ या रीतीचें विशेष स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें :

१ महायुग ( १५७७९१७८०० दिवसांचें ) = { ४३२०००० सूर्य वर्षें = ३७५० × ११५२ ; ४३७०६८८ गुरु वर्षें = ३७९४ × ११५२ }

$\therefore$ ३७५० सूर्य वर्षें = ३७९४ गुरु वर्षें.

$\therefore$ ४३९ ( शके ४४० मधलीं गतवर्षें ) सूर्य वर्षें = $\frac{४३९ \times ३७९४}{३७५०} = \frac{१६६५५६६}{३७५०}$ गुरु वर्षें.

शकपद्धति सुरू झाली त्या दिवशीं, **वराहमिराच्या मतानुसार**, $\frac{८५८९}{३७५०} = २\,\frac{१०८९}{३७५०}$ संवत्सरें पूर्ण झाली होतीं.

$$\therefore \frac{१६६५५६६}{३७५०} + \frac{८५८९}{३७५०} = \frac{१६७४१५५}{३७५०} = ( ४४६\ \frac{१६५५}{३७५०} ).$$

या काळांत षष्टिसंवत्सरचक्राचे ७ फेरे पूर्ण होऊन ( ४४६ ÷ ६० भागाकार = ७ ) २६ संवत्सरेंहि ( शेष = २६ ) पूर्ण झालीं होतीं. त्याचप्रमाणें २७ व्या संवत्सराचा $\frac{१६५५}{३७५०}$ इतका भागहि पूर्ण झाला होता. उरलेला $\frac{२०९५}{३७५०}$ हा भाग ( त्याच संवत्सराचा ) शके ४४० च्या सुरवातीला येईल. तो संपल्यानंतर, शके ४४० मध्येंच, $\frac{१६५५+४४}{३७५०}$ ( गुरु ) वर्षांत, त्याच्या पुढला ( 'जय' ) संवत्सर राहील.

$$\therefore \text{शके ४४०} = \frac{२०९५}{३७५०}\ \text{' विजय '} + \frac{१६९९}{३७५०}\ \text{' जय '}.$$

शकपद्धति सुरू झाली त्या दिवशीं $\frac{८५८९}{३७५०}$ ( $२\,\frac{१०८९}{३७५०}$ ) संवत्सरें पूर्ण झालीं होतीं असें वराहमिहिर सांगतो. पण, आर्यभटाच्या मतानुसार ही संख्या थोडी जास्त येते. ती अशी : कलियुगाच्या आरंभापासून शक-पद्धति सुरू होईपर्यंतचीं सूर्य वर्षें = ३१७९ ( गतकलि ). ३१७९ सूर्य वर्षें = ३१७९ × $\frac{३७९४}{३७५०}$ = ३२१६ $\frac{११२६}{३७५०}$ गुरु वर्षें.

कलियुग सुरूं झालें तेव्हां षष्टिसंवत्सरचक्रांतील २७ वें ( विजय ) संवत्सर सुरूं होतें.

$$\therefore ३२१६\,\frac{११२६}{३७५०} + २६ = ३२४२\,\frac{११२६}{३७५०}.$$

या काळांत षष्टिसंवत्सरचक्राचे ५४ फेरे पूर्ण होऊन ( ३२४२ ÷ ६० भागा ० = ५४; शेष = २ ) २ संवत्सरेंहि पूर्ण झालीं होतीं व तिसऱ्या ( शुक्ल ) संवत्सराचा $\frac{११२६}{३७५०}$ भाग लोटला होता.

$\therefore$ **आर्यभटाच्या मतानुसार** शकपद्धति सुरू झाली त्या दिवशीं $२\frac{११२६}{३७५०}$ संवत्सरें पूर्ण झालीं होतीं.

६ 'Indian Antiquary', Book II. p. 126.

७ 'Epi. Indica', Vol. XVII, p. 50.

∴ शके ७२६ = $\frac{७६१}{३७५०}$ चित्रभानु + $\frac{३०३३}{३७५०}$ 'सुभानु.'

**( ३ ) शके ६९०, 'प्लवंग' संवत्सर –**
**[ राष्ट्रकूट कृष्ण पहिला याचा ताम्रपट ]**[८]

६८९ × ४४ = ३०३१६

३०३१६ + ८५८९ = ३८९०५

३८९०५ ÷ ३७५० = १०$\frac{१४०५}{३७५०}$

१० + ६८९ = ६९९

६९९ ÷ ६० शेष = ३९

३९ + १ = ४०

शके ६९० या वर्षी ४० वें ( 'पराभव' ) संवत्सर येईल.[९] पण, शके ६९० च्या सुरुवातीला $\frac{२३४५}{३७५०}$ या भागांत 'पराभव' पूर्ण झाल्यानंतर बाकीच्या $\frac{१४०५}{३७५०}$ वर्षांत ( ४१ वें ) 'प्लवंग' संवत्सर राहील.

∴ शके ६९० = $\frac{२३४५}{३७५०}$ पराभव + $\frac{१४४९}{३७५०}$ प्लवंग.

**( ४ ) शके ८६२, 'शर्वरी' संवत्सर –**
**[देवळी येथील कृष्ण ३ रा याचा ताम्रपट]**[१०]

या ताम्रपटांत 'वैशाखबहुलपञ्चम्यां'[११] ( वैशाख कृष्ण ५ ) ही तिथि स्पष्ट दिलेली असल्यामुळें शके ८६१ हा गतशक मानावा लागतो.[१२]

म्हणजे ८६१ वर्षे पूर्ण झालीं होतीं.

८६१ × ४४ = ३७८८४

३७८८४ + ८५८९ = ४६४७३

४६४७३ ÷ ३७५० = १२$\frac{१४७३}{३७५०}$

१२ + ८६१ = ८७३

८७३ ÷ ६०, शेष = ३३

शके ८६१ पूर्ण होईपर्यंत ३३ वें ( 'विकारी' ) संवत्सर पूर्ण होऊन ३४ व्या ( शर्वरी ) चा $\frac{१४७३}{३७५०}$ भाग लोटला होता. हा भाग संपेल त्या दिवशीं शके ८६१ हि संपेल.

**( ५ ) शके ९८७, 'पराभव' संवत्सर.**
**[ मधुरान्तकदेवाचा राजापूर ताम्रपट[१३] ]**

९८६ हा गत शक

∴ ९८६ × ४४ = ४३३८४

४३३८४ + ८५८९ = ५१९७३

५१९७३ ÷ ३७५० = १३ $\frac{३२२३}{३७५०}$

१३ + ९८६ = ९९९

९९९ ÷ ६०, शेष = ३९

∴ शके ९८६ पूर्ण होईपर्यंत ३९ वें ( विश्वावसु ) संवत्सर पूर्ण होऊन ४० व्या ( 'पराभव' ) चा $\frac{३२२३}{३७५०}$ भाग संपला होता. 'पराभव'चा बाकीचा भाग शके ९८७ च्या सुरुवातीला येईल.

**( ६ ) शके १००८, 'प्रभव' संवत्सर.**
**[ सीताबर्डी शिलालेख[१४] ]**

१००७ गत शक.

∴ १००७ × ४४ = ४४३०८

४४३०८ + ८५८९ = ५२८९७

५२८९७ ÷ ३७५० = १४ $\frac{३९७}{३७५०}$

१४ + १००७ = १०२१

१०२१ ÷ ६०, शेष = १

∴ शके १००७ त 'प्रभव' संवत्सर पूर्ण होऊन 'विभवा'चाहि $\frac{३९७}{३७५०}$ भाग लोटला होता.

**आणखी कांहीं उदाहरणें**

गेल्या लेखांत उल्लेखिलेल्या शके ११०० पूर्वींच्या सर्व उदाहरणांतील शक-संवत्सरें आतांपर्यंत तपासून पाहिलीं. वराहमिहिराच्या रीतीनुसार त्यांतल्या शक-संवत्सरांचा मेळ बरोबर जुळतो. या रीतीनुसार जुळणारे आणखी कांहीं ताम्रपट व शिलालेख यांचीं उदाहरणें पुराव्यादाखल सादर करतों—

---

८ 'Indian Antiquary', Vol. XLII, January 1913, p. 27.

९ 'Epi. Ind.': Vol. XVII, p. 48.

१० 'Inscription in C. P. & Berar'– ( Hiralal ) P. 9.

११ 'Epi. Ind.', Vol. V. p. 189.

१२ गतवर्ष व वर्तमानवर्ष यांच्याबद्दलची माहिती 'भारतीय ज्योतिःशास्त्र,' पृ. ३७१–३७२ यांत पहावी.

१३ Inscriptions in the C. P. & Berar, P. 163.

१४ Inscriptions in the C. P. & Berar, P. 3.











(७) शके ७३५, ' नंदन ' [ तोरखेडे ताम्रपट[१५] ]
(८) शके ७८२ (गत), ' विक्रम '
[ पहिल्या अमोघवर्षाचा कोन्नुर शिलालेख[१६] ]
(९) शके ८२८, ' प्रभव ' [ अमोघवर्षाचा वेंकटापूर शिलालेख[१७] ]
(१०) शके ९०२, ' विक्रम ' तैल २ याचा सोगल शिलालेख[१८] ]
(११) शके ८६०, ' विकारी ' सूदि येथील एक ताम्रपट[१९] ]

( ८६९ × ४४ = ३७७९६;
३७७९६ + ८५८९ = ४६३८५
४६३८५ ÷ ३७५० = १२ $\frac{१३८५}{३७५०}$.
१२ + ८५९ = ८७१
८७१ ÷ ६०, शेष = ३१. ३१ + १ = ३२.)
∴ शके ८६० = $\frac{२६६५}{३७५०}$ ' विलंबी + $\frac{१४२९}{३७५०}$ ' विकारी.'

**शके अकराशत दाहोत्तरे । ११९० ।**
**साधारन संवसत—**

आतां, वराहमिहिराच्या रीतीनुसार ' विवेकसिंधू'-तील शके ११९० त गेल्या लेखांत उल्लेखिलेल्या महानुभावीय हस्तलिखितांतील शके ११०० नंतरचीं शक-संवत्सरें तपासून पहावयाचीं—

११०९ × ४४ = ४८७९६
४८७९६ + ८५८९ = ५७३८५
५७३८५ ÷ ३७५० = १५ $\frac{११३५}{३७५०}$
१५+११०९ = ११२४
११२४ ÷ ६०, शेष = ४४ ( साधारण )
४४ + १ = ४५ = ( विरोधकृत् )

म्हणजे, ' साधारण ' संवत्सर ( ४४ वें ) शके ११०९ मध्यें येईल. शके ११०९ मध्यें ' साधारण ' पूर्ण होऊन ( ४५० व्या ) ' विरोधकृत् ' संवत्सराचा $\frac{११३५}{३७५०}$ भागहि संपलेला असेल. त्या संवत्सराचा राहिलेला भाग $\left(\frac{२६१५ + ४४}{३७५०} = \frac{२६५९}{३७५०}\right)$ शके १११० मध्यें पूर्ण होईल. व शके १११० च्या उत्तरार्धांत ( ४६ वें ) ' परिधावी ' संवत्सर राहील.

याच रीतीच्या दुसऱ्या प्रकारानें प्रस्तुत गणित करून पाहूं—[२०]

---

१५ Ep. Indi. Vol. III, p. 54. १६ Ep. Indi., Vol. VI, P. 26.
१७ Ep. Indi., Vol. XXVI, P. 60. १८ Ep. Indi., Vol. XVI, P. 2.
१९ Ep. Indi., Vol. III, P. 159.

२० या रीतीचें विशेष स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें—
१ सूर्यवर्ष = १ $\frac{४४}{३७५०}$ गुरु वर्षें ( वराहमिहिर )
कलियुग शकापूर्वी ३१७९ वें वर्षी लागलें असें वेदांगज्योतिषावरून निश्चित होतें.
∴ ३१७९ ( गतकलि ) सूर्य-वर्षें = ३२१६ $\frac{११२६}{३७५०}$ गुरुवर्षें.

कलियुग २७ व्या ( विजय ) संवत्सरापासून सुरूं झालें. म्हणून, गतकलीच्या गुरुवर्षांत २६ मिळवून त्यांना ६० नें भागलें असतां जी बाकी उरेल तो आंकडा हा पहिल्या शकाचा संवत्सर.

∴ ३२१६ $\frac{११२६}{३७५०}$ + २६ ÷ ६० = २ $\frac{११२६}{३७५०}$. ( यावरून, सूर्यसिद्धान्तानुसार आर्यभटानें दिलेली २ $\frac{११२६}{३७५०}$ ही संख्या बरोबर आहे असें दिसून येतें. वराहमिहिराच्या ८५८९ या संख्येवरून त्याला अभिप्रेत असलेले गुरूचे नाक्षत्रभगण ३६४१९०००० ठरतात). कोठल्याहि शकाचा संवत्सर काढावयाचा असल्यास गत-शकाच्या गुरुवर्षांत २ $\frac{११२६}{३७५०}$ मिळवावयाचे व नंतर ६० चा भाग देऊन जी बाकी उरेल, त्याच्या पुढला वर्तमान शकाचा संवत्सर समजावा.

$$\therefore ११०९ + \frac{४४ \times ११०९}{३७५०} + २\frac{१०८९}{३७५०} \div ६०, \text{ शेष} = ४४$$

∴ ४५ वें ( विरोधकृत् ) हें शके १११० च्या सुरुवातीचें संवत्सर. ( शके १११० सुरू होईल त्या दिवशी ' विरोधकृत् ' संवत्सराचा $\frac{११३५}{३७५०}$ भाग पूर्ण झाला असेल ).

$$११०९ + \frac{४४ \times ११०९}{३७५०} + २\,\frac{१०८९}{३७५०} \ast$$

$$११०९ + १३\,\frac{४६}{३७५०} + २\,\frac{१०८९}{३७५०}$$

$$११०९ + १५\,\frac{१३३५}{३७५०}$$

$$११२४\,\frac{११३५}{३७५०} \div ६०, \text{ शेष} = ४४$$

∴ शके ११०९ मध्यें ४४ संवत्सरें पूर्ण होऊन ४५ व्या 'विरोधकृत्'ला आरंभ झालेला असेल.

वरच्या दोन्हीहि रीतींनुसार—

शके ११०९ = साधारण[२१]+विरोधकृत्[२२]

शके १११० = विरोधकृत्[२३]+परिधावी[२४]

शके १११०त 'साधारण' संवत्सर न येतां 'विरोधकृत्' येतो. म्हणजे १ संवत्सराचा फरक पडतो. याचें कारण काय असावें ?

**( १२ ) 'शके ११८५, क्रोधनाम संवत्सरीं...'[२५] [ अन्वयस्थळ ]**

$$११८४ + \frac{४४ \times ११८४}{३७५०} + २\,\frac{१०८९}{३७५०}$$

$$११८४ + १३\,\frac{३३४६}{३७५०} + २\,\frac{१०८९}{३७५०}$$

$$११८४ + १६\,\frac{६८५}{३७५०}$$

$$१२००\,\frac{६८५}{३७५०} \div ६०, \text{ शेष} = ०$$

∴ शके ११८५च्या प्रारंभीं 'प्रभव' संवत्सर राहील[२६]

**( १३ ) 'शके ११८६ क्षए संवत्सरी ...'[२७] [ अन्वयस्थळ ]**

$$११८५ \times \frac{४४ \times ११८५}{३७५०} + २\,\frac{१०८९}{३७५०}$$

$$११८५ + १३\,\frac{३३९०}{३७५०} + २\,\frac{१०८९}{३७५०}$$

$$११८५ + १६\,\frac{७२९}{३७५०}$$

$$१२०१\,\frac{७२९}{३७५०} \div ६०. \text{ शेष} = १$$

$$१ + १ = २ \text{ ( विभव )}$$

∴ शके ११८६च्या प्रारंभीं 'विभव' संवत्सर राहील.[२८]

**( १४) 'शके ११८८ विभव संवत्सरीं...' [ अन्वयस्थळ ]**

$$११८७ + \frac{४४ \times ११८७}{३७५०} + २\,\frac{१०८९}{३७५०}$$

$$११८७ + १३\,\frac{३४७८}{३७५०} + २\,\frac{१०८९}{३७५०}$$

$$११८७ + १६\,\frac{८१७}{३७५०}$$

$$१२०३\,\frac{८१७}{३७५०} \div ६०. \text{ शेष} = ३$$

$$३ + १ = ४ \text{ ( प्रमोद )}$$

∴ शके ११८८ च्या आरंभीं 'प्रमोद' संवत्सर राहील[२९].

---

२१ Epi. Indi., Vol. XVII, p. 80, p. 262.

२२ An Indian Ephemeris–Pillai, Vol. III, p. 377.

२३ Epi. Indi., Vol. XVII, p. 80, p. 262.

२४ Ind. Ephem., Vol. III, p. 379.

२५ 'चक्रधरचरित्र' ( डॉ. कोलते ), पृ. २९१.

२६ Epi. Indi., Vol. XVII, p. 86, p. 268.

२७ 'चक्रधरचरित्र' पृ. २९१.

२८ Epi. Ind., Vol. XVII, p. 86, p. 268.

२९ Epi. Ind., Vol. XVII, p. 86, p. 268.

* $२\frac{१०८९}{३७५०}$ हा आकडा वराहमिहिराचा आहे. आर्यभटाच्या मतानुसार शकारंभीं $२\frac{११२६}{३७५०}$ संवत्सरें पूर्ण झालीं होतीं. [ मागें तळटीप ५ पहा ].










**( १५ ) ‘ शके ११९०, * प्रमोद संवत्सरीं ......, ’[३०] [ अन्वयस्थळ ]**

$$\text{११८९} + \frac{\text{४४+११८९}}{\text{३७५०}} + \text{२}\frac{\text{१०८९}}{\text{३७५०}}$$

$$\text{११८९} + \text{१३}\frac{\text{३५६६}}{\text{३७५०}} + \text{२}\frac{\text{१०८९}}{\text{३७५०}}$$

$$\text{११८९} + \text{१६}\frac{\text{९०५}}{\text{३७५०}}$$

$$\text{११९५}\frac{\text{९०५}}{\text{३७५०}} \div \text{६०. शेष} = \text{५}$$

५ + १ = ६ ( अंगिरा )

∴ शके ११९० च्या प्रारंभीं ‘ अंगिरा ’ संवत्सर राहील.

**( १६ ) ‘ शके ११९१ प्रजापति संवत्सरीं ’ [ अन्वयस्थळ ]**

$$\text{११९०} + \frac{\text{४४×११९०}}{\text{३७५०}} + \text{२}\frac{\text{१०८९}}{\text{३७५०}}$$

$$\text{११९०} + \text{१३}\frac{\text{३६१०}}{\text{३७५०}} + \text{२}\frac{\text{१०८९}}{\text{३७५०}}$$

$$\text{११९०} + \text{१६}\frac{\text{९४९}}{\text{३७५०}}$$

$$\text{१२०६}\frac{\text{९४९}}{\text{३७५०}} \div \text{६०. शेष} = \text{६}$$

६ + १ = ७ ( श्रीमुख )

∴ शके ११९१ च्या प्रारंभीं ‘ श्रीमुख ’ संवत्सर राहील.

**(१७) ‘शके ११९३ श्रीमुख संवत्सरीं...’[३१] [ अन्वयस्थळ ]**

$$\text{११९२} + \frac{\text{४४×११९२}}{\text{३७५०}} + \text{२}\frac{\text{१०८९}}{\text{३७५०}}$$

$$\text{११९२} + \text{१३}\frac{\text{३६९८}}{\text{३७५०}} + \text{२}\frac{\text{१०८९}}{\text{३७५०}}$$

$$\text{११९२} + \text{१६}\frac{\text{१०३७}}{\text{३७५०}}$$

$$\text{१२०८}\frac{\text{१०३७}}{\text{३७५०}} \div \text{६०. शेष} = \text{८}$$

८ + १ = ९ ( युवा )

∴ शके ११९३ च्या आरंभीं ‘युवा’ संवत्सर राहील.

गेल्या लेखांतल्या उदाहरणांतील सर्व शकसंवत्सरें, वराहमिहिराच्या रीतीनुसार, आतांपर्यंत तपासून पाहिलीं. मीं पाहिलेल्या ‘सूत्रपाठा’च्या एका हस्तलिखित पोथींतील पुढील उताराहि या दृष्टीनें लक्षणीय वाटतो.–

“ सकें ११८५ : क्रोध नाव संवत्सरे : जेष्ट मासे झांडीहुनि : गोसावी बीजे केले :

सकें ११८६ : क्षए संवत्सरीं : कार्तिक मासीं प्रतेष्ठानी बाईसा भेटी दीधली :

सकें ११८८ : विभव नाव संवत्सरे : चैत्रमासे : सींहनगरी भट्टा भेटि दीधली :

सकें ११९० : प्रमोदि संवत्सरे : माघ मासीं : खडकुलीएसि भट्टां आनुसरण :

सकें ११९१ : प्रजापति संवत्सरे : जेष्ट मासे : डोंबेग्रामीं माहींभट्टा भेटि दिधली :

सकें ११९३ : श्रीमुख संवत्सरे : वैशाख वदि ... माहींभट्टा आनुसरण :

११९३ : श्रीमुख संवत्सरे : श्रावण मासे : बाईसा देहत्यागु :

सकें ११९३ : श्रीमुख नाव संवत्सरे : माघ मासे : सुदी चौथीसी सोमवारीं गोसावी बीजे केले : सकें ११९४ ॥ ”

**शके ११९०, ‘ साधारण ’ संवत्सर—**

वराहमिहिराच्या रीतीनुसार शके १११० मध्यें ‘ साधारण ’ संवत्सर न येतां तो शके ११०९ मध्यें येतो, हें आपण पाहिलेंच. तरी मुकुंदराजांनीं ‘ शके अकरा शत दाहोत्तरू । साधारण संवत्सरू । – ’ असा उल्लेख केला आहे. तो चुकीचा म्हणता येईल का ?

गतशक लेखनाच्या पद्धतीनुसार तो चुकीचा म्हणतां येणार नाहीं. ‘ भारतीय ज्योतिःशास्त्र ’कर्ते दीक्षित यांनीं गतशकाचें एक उदाहरण दिलें आहे. ते म्हणतात –[३२]

---

* “ शके ११८६ क्षए संवत्सरीं कार्तिक मासीं प्रत्येष्टानीं आबाइसा भेटि दीधली ॥ शके ११८८ विभव संवत्सरीं चैत्रमासीं श्रीनगरी भटा भेटि दीधली ॥ शके ११९० प्रमोद संवत्सरीं माघमासीं खडकुलीसी भटां अनुसरण. ”– या दोन्ही उल्लेखांतील शकांचा संवत्सरांशी मात्र मेळ पडत नाहीं. त्यामुळें त्यांच्यावर विश्वास ठेवतां येत नाहीं – डॉ. कोलते ( **भास्करभट्ट बोरीकर** : पृ. ७५ ).

३० ‘चक्रधरचरित्र’, पृ. २९३  ३१ ‘चक्रधरचरित्र’, पृ. २९३.  ३२ ‘भा. ज्यो. शास्त्र’, पृ.३७१








' ब्रह्मगुप्ताच्या वर्णनांत ( पृ. २२५ ) उत्तर-पुराणाचा रचनाकाल सांगितला आहे. तो शक ८२० हा आहे. परंतु त्या वेळची ग्रहस्थिति दिली आहे, ती ८२० याबद्दल सांप्रतच्या पद्धतीनें ८१९ धरून जुळते. '

गतशककलेखनाची पद्धति प्रचारांत होती याबद्दल शिलालेख व ताम्रपट यांतलेहि निर्देश सादर करतां येतील:—

[१] ' शकभूपाल-कालातिक्रमत-संवत्सर-शतमंगल ९३३ नेय साधारणं-संवत्सर ... ... '[33] [34]

[२] ' शक-वरिष बोंभयनूर-नलवट्ट-मुरेण्य वरिषद रौद्र-संवत्सरद ... ... '[35]

[३] ' शक-वर्षेषु पञ्चषष्ट्युत्तरसहस्र – प्रमितेषु अतीतेषु प्रवर्त्तमान-दुंदुभि-संवत्सर ... ... '[36]

[४] ' शक-वर्षेषु त्रिसप्त–त्युत्तर–सहस्र–प्रमितेषु = अतीतेषु अंकतोऽपि १०७३ प्रवर्त्तमान-प्रमोद – संवत्सर......'[37]

[५] ' शाकाब्दे गगनाभ्रविश्वगणिते सिध्धार्थिं संवत्सरे......'[38]

[६] ' शके ८९५ ( गत ) ' श्रीमुख ' संवत्सर ...'[39]

अर्थात् या पद्धतीनुसार, मुकुंदराजांनीं केलेला कालोल्लेख चुकीचा नसून तत्कालीन शक – संवत्सर-गणनापद्धतीच्या एका प्रवाहाशीं पूर्णपणें सुसंगत आहे, असें म्हणावें लागतें. कारण, शके ११०९ ( गत ) मध्यें ' साधारण ' संवत्सर बरोबर येतो.

### क्षय-संवत्सराची मीमांसा

षष्टिसंवत्सरचक्रांत संवत्सरांचीं ६० नावें ठरविलीं आहेत. ज्या सौर वर्षांत मीन राशीमधून मेष राशींत गुरूचें संक्रमण होईल त्याला पहिलें नांव द्यावयाचें व ज्या सौर वर्षांत गुरूचें मेष-राशीमधून वृषभ-राशींत संक्रमण होईल त्याला दुसरें नांव द्यावयाचें – अशीं ६० नावें देत जावयाचीं. अशा एका संक्रमणास ३६१·४८७३५ दिवस किंवा ३६७·२२५ तिथी लागतात. अर्थात्, एखादें वर्ष असें येईल कीं त्यांत हें संक्रमण दोनदां होईल व म्हणून त्या वर्षाला दोन नांवें प्राप्त होतील. अशा वेळीं एक नांव सोडून द्यावें लागेल. म्हणजे एका संवत्सराचा क्षय होईल. हिला ' मध्यमराशिपद्धति ' म्हणतात. [40]

गुरूच्या गतीवरून बसविलेली संवत्सराची दुसरीहि एक पद्धति आहे. या पद्धतीनुसार गुरूच्या एका उदयानंतर दुसरा उदय होण्यास ३९८·८८४ दिवस किंवा ४०५·२२४६५ तिथी लागतात. वेदांग ज्योतिषा-प्रमाणें वर्ष ३६० तिथींचें किंवा ३९० तिथींचें होतें. चांद्रसौर वर्ष न घेतां सौर वर्षच घेतलें तर त्याच्या ३७१ तिथी होतात. अर्थात् या पद्धतीनें क्षय-संवत्सराची उपपत्ति लागूं शकत नाहीं. म्हणून येथें पहिलीच पद्धति स्वीकारली पाहिजे.

त्यानुसार, शके १११०त ४५ वें संवत्सर येऊनहि एका संवत्सराचा क्षय झाल्यामुळें, मुकुंदराजांनीं ४४ वें ( साधारण ) संवत्सर त्या वर्षीं नमूद केलें असावें.

या दृष्टीनें मुकुंदराजांनीं ' विवेकसिंधू ' त केलेला कालोल्लेख चुकीचा नसून सुसंगत आहे असें म्हणावें लागेल.

### बंद पडलेली वास्तव–बार्हस्पत्य गणना

याला आणखीहि एक कारण दाखवितां येईल. आणि तें म्हणजे नर्मदेच्या दक्षिणेला शके ८२७ नंतर ( ' भारतीय ज्योतिःशास्त्र ' कर्ते दीक्षित यांच्या मतानुसार ) बंद पडलेली वास्तव बार्हस्पत्य गणना. सुमारें

३३ शके ९३३ ' साधारण ' ( ' Sadharana was Saka 933 current ' Lionell D. Barnett )

३४ शके ९३३ ' साधारण [ विक्रमादित्य ५ याचा अलुर शिलालेख. ] ( Epi. Ind., XVI, P.28 )

३५ श. ९४३ ' रौद्र ' [ बाणेश्वर मंदिरांतील शिलालेख. ] ( Epi. Ind. VI, P. 20 )

३६ श. १०६५ ' दुंदुभि [ शिलाहार विजयादित्याचा कोल्हापूर शिलालेख. ] ( Epi. Ind. III, P. 209 )

३७ श. १०७३ ' प्रमोद ' [ भोज २ याचा कोल्हापूर शिलालेख. ] ( Epi. Ind. III, P. 212 )

३८ श. १३०० ' सिद्धार्थी ' [ अन्नवेमाचा वनपल्ली ताम्रपट. ] ( Epi. Ind. III, P. 60 )

३९ Indian Antiquary, Vol. XXI, P. 167

४० विद्वद्रत्न डॉ. के. ल. दप्तरी.










८५ सौरवर्षांत बार्हस्पत्य संवत्सराचीं ८६ वर्षे होतात.[४१] म्हणजे बार्हस्पत्य मानानें सुमारें ८५ वर्षांत एका संवत्सराचा क्षय होतो. वराहमिहिराच्या कालमापनात्मक गणितांत या क्षयसंवत्सरपद्धतीचा अंतर्भाव असल्यामुळें ती पद्धति बंद झाल्यानंतर शक व संवत्सर यांच्यांत वराहमिहिराच्या रीतीनुसार साहाजिकच अधिकाधिक फरक पडत जातो. शके १११० त एका संवत्सराचा व त्यानंतरच्या उदाहरणांत दोन संवत्सरांचा फरक पडण्याचें कारण हेंच असावें.

ही पद्धति नर्मदेच्या दक्षिणेला कधींपासून बंद झाली याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत.[४२] पण, शके ८२७त ती बंद झाली असें क्षणभर मानलें तर त्यानंतर ज्ञानेश्वरीपूर्वकालापर्यंत नर्मदेच्या दक्षिणेकडील कांहीं प्रांतांत व विशेषतः विदर्भांत शके ९९८पूर्वी ८५ वर्षे प्रचारांत असलेली व त्यानंतर स्थगित झालेली वास्तव बार्हस्पत्यपद्धतीहि रूढ होती असें म्हणावेसें वाटतें. [ यासंबंधींचें अधिक विवेचन गेल्या लेखांत ( ' नवभारत, ' ऑगस्ट ५५ ) पहावें ].

सारांश, ज्योतिर्गणिताच्या निरनिराळया दृष्टींनीं विचार केला तरी मुकुंदराजांनीं ' विवेकसिंधू 'त केलेला शक-संवत्सरांचा उल्लेख चुकीचा नसून तत्कालीन शक-संवत्सरगणनापद्धतीच्या एका प्रवाहाशीं पूर्णपणें सुसंगत आहे, असें दिसून येतें. तो पूर्णपणें शास्त्रीय आहे.

**एक तर्क व त्याचें निरसन**

कांहीं अभ्यासक[४३] असा तर्क करतात कीं मुकुंदराजांनीं १११० हें शक शालिवाहनाचें व ' साधारण ' हें संवत्सर विक्रमाचें लिहिलें असावें. शालिवाहन शक व विक्रम संवत् यांत १३४।१३५ वर्षांचें अंतर असतें. ' शकांत १३४।१३५ मिळवून कार्तिकादि विक्रमवर्ष निघतें; आणि १३५ मिळवून चैत्रादि विक्रमवर्ष निघतें. '[४४] म्हणून, शालिवाहन शकसंख्येंत १३४ मिळवून नंतर त्याला ६० नें भागून उरणाऱ्या [१११० + १३४ ÷६०. शेष = ] ४४ व्या क्रमांकाचें ( साधारण ) संवत्सर मुकुंदराजांनीं शालिवाहन शकाबरोबर नमूद केलें असावें. अंभोर येथें येण्यापूर्वी मुकुंदराज काशीला राहत होते व उत्तर हिंदुस्थानांत विक्रम संवतच जास्त प्रचारांत आहे हेंहि एक कारण, या संदर्भांत, ते पुढे करतात. लो. ना. बापूजी अणे यांनीं गोगटे यांच्या ' विवेकसिंधू'ला लिहिलेल्या प्रस्तावनेंत या तर्काचा उल्लेख केला आहे. या रीतीनुसार महानुभावहस्तलिखितांतील शक-संवत्सरांचे उल्लेख हा त्यांना मोठाच आधार वाटेल.

मुकुंदराज अंभोऱ्याला येण्यापूर्वी काशीला रहात होते हें खरें. व तिकडे विक्रम संवतच जास्त प्रचारांत आहे हेंहि खरें. पण त्यांना विक्रम संवताप्रमाणें कालगणना करावयाची असती तर त्यांनीं शक शालिवाहनाचा कशाला दिला असता ? त्यांना जर संवत्सर विक्रमशकानुसार द्यावयाचें असतें तर त्यांनीं शकहि विक्रमाचाच दिला असता.

एकनाथांनीं ' रुक्मिणीस्वयंवर ' व ' एकनाथी भागवत ' हे दोन ग्रंथ काशीला लिहिले. रुक्मिणीस्वयंवराच्या शेवटीं--

> ' तै शके चवदाशें च्याण्णव । प्रजापति संवत्सराचें
> नांव ' ( १८,८५)

असा स्पष्ट उल्लेख करून त्यांनीं शालिवाहन-शकाबरोबर शालिवाहनाच्याच संवत्सराचा निर्देश केला आहे.

प्रतिष्ठानला ग्रंथारंभ करून, तेथें पंचाध्याय संपादन करून ' वाराणसी मुक्तिक्षेत्रां'त ' मणिकर्णिकामहातीरीं' पूर्ण केलेल्या भागवतटीकेंतहि—

> ' स्वदेशीचा शकसंवत्सर । दंडकारण्य श्रीरामक्षेत्र ।
> प्रतिष्ठान गोदातीर । तेथील उच्चार तो ऐका ॥

४१ गेल्या लेखांत ( ' नवभारत ' ऑगस्ट १९५५ पृ. १२ ) हा आकडा चुकून ८४ पडला आहे.

४२ R. Sewell यांनी कै. दीक्षित यांच्याबरोबर हा काळ शके ८२७ मानला आहे. ( Epi. Ind. Vol. XVII, P. 156 and P. 240 ). डॉ. कीलहॉर्न यांनी तो वेगळा ( शके ८५५ ) मानला आहे. पिळे यांच्या जंत्रीवरून त्यांना शके ८९९ अभिप्रेत असावें असें दिसतें. श्री. ग. ह. खरे यांनी श. ८३० हा काळ नमूद केला आहे. ( ' संशोधकाचा मित्र,' १, पृ. ९३ )

४३ उदाहरणार्थ— श्री. ढोक यांचा लेख, ' महाराष्ट्र ' ( नागपूर ) ता. १७–१२–५१.

४४ ' भारतीय ज्योतिःशास्त्र ', पृ. ३७४.



अनुक्रमणिका






शालिवाहन शक वैभव । संख्या चौदाशे पंचाणव ।
' श्रीमुख ' संवत्सराचें नांव । टीका अपूर्व तें
जाहली ॥ ' ( ए. भा. ३१, ५५३-५५४)

असा शालिवाहन शक-कालगणनापद्धतीनुसार त्यांनीं कालोल्लेख केला आहे.

त्याच ग्रंथांत एकनाथांनीं विक्रमकालानुसारहि कालनिर्देश केला आहे. पण तो करतांना त्यांनीं शक व संवत्सर दोन्हीहि विक्रमाचेच लिहिले. शक शालिवाहनाचा व संवत्सर विक्रमाचा असा प्रकार केला नाहीं. ते लिहितात —

' वाराणसी महामुक्तिक्षेत्र । विक्रमशक 'वृष' संवत्सर ।
शके सोळाशें तीसोत्तर । टीका एकाकार जनार्दनकृपा ॥
महामंगळ कार्तिकमासीं । शुक्ल पक्ष पौर्णिमेसी ।
सोमवार शिवयोगेंसीं । टीका एकादशी समाप्त केली ॥'
( ए. भा. ३१, ५५१-५५२ )

मुकुंदराजांनींहि विक्रमकालानुसार कालोल्लेख केला असता तर विक्रमसंवत्सराबरोबर विक्रम शकाचाहि स्पष्ट निर्देश केला असता. ' वेदवेदांतबीज ' असें कृष्णदयार्णवांनीं ज्यांचें वर्णन केलें ते ' महायोगी ' मुकुंदराज अशा रीतीनें सर्वथैव चुकीची कालगणना करतील असें वाटत नाहीं.

सर्वथैव चुकीची ! कारण, विक्रमसंवताचा संवत्सर काढण्याची जी रीति[४५] श्री. ढोक यांनीं आपल्या लेखांत दिली आहे ( व जी प्रचलित आहे ), तिच्यानुसारहि शके १११० मध्यें [ १११० + १३४ = वि. सं. १२४४ ] साधारण संवत्सर येत नाहीं. त्या रीतीनुसार १२४४ ला ६० नें भागून चालणार नाहीं, तर १२४४ मध्यें ९ मिळवून त्या संख्येला ( १२५३ ला ) ६० नें भागावें लागेल. उरणारा आंकडा (५३) हा संवत् १२४४ चा संवत्सर होईल. अर्थात्, वि. सं. १२४४ मध्यें ' साधारण ' संवत्सर येणार नाहीं.

एकनाथांनीं भागवतटीकेंत बार्हस्पत्य-गणनेनुसार वि. संवताचा संवत्सर लिहिला आहे. त्या गणनेनुसारहि, वि. सं. १२४४ त ' साधारण ' संवत्सर येत नाहीं.

तेव्हां, कोणत्याहि दृष्टीनें विचार केला तरी मुकुंदराजांनीं शक शालिवाहनाचा व संवत्सर विक्रमाचा लिहिला असावा या तर्कांत कांहींहि अर्थ नाहीं. असो.

आतांपर्यंत ज्योतिर्गणिताच्या निरनिराळ्या रीतींनीं विचार करून ' शके अकराशत दाहोत्तरे । साधारन संवसत -- ' हा मुकुंदराजांनीं ' विवेकसिंधू 'त केलेला कालोल्लेख चुकीचा नसून पूर्णपणें शास्त्रीय आहे हें ताम्रपट व शिलालेख यांचीं उदाहरणें देऊन सिद्ध केलें. यापुढें तरी शके १११० त साधारण संवत्सर येत नाहीं व म्हणून मुकुंदराजांनीं केलेला कालोल्लेख चुकीचा आहे ही भावे-पांगारकरांपासून चालत आलेली संशोधकांची तक्रार राहूं नये. मुकुंदराजांनीं काय किंवा महानुभाव ग्रंथकारांनीं काय आपल्या ग्रंथांत शक-संवत्सरांचे जे उल्लेख केले आहेत ते, पिल्लेजंत्रीनुसार जुळत नसले तरी चूक, ' अविश्वसनीय ' किंवा ' अशास्त्रीय ' व ' अनुपयोगी ' आहेत असें म्हणतां येणार नाहीं.

---

## कधीं वाटतें —

कधीं वाटतें मेघ होउनी
गिरिशिखरांना चुंबावें
वैशाखांतिल तृषार्त भूवर
जल होउनिया वर्षावें.

मृद्‌गंधासम कधीं वाटतें
कणाकणांतुन वितरावें
तृणपर्णांतुन, फलपुष्पांतुन
रसरंगीं न्हावें.

मृदुल कोवळें ऊन होउनी
स्थिरचर करांत कवळावें
जीवनांतलें अखंड चेतन
अचेतनांतुन फुलवावें.

सूर्यफुलापरि प्रकाशाभिमुख
मन माझें व्हावें
कधीं रजनिची काळी किमया
पिउनी मस्त बनावें.

दिक्कालाच्या अतीत होउन
व्यापुनि विश्व उरावें
मीपण माझें सोऽहंतेच्या
दिव्यत्वांत विरावें !

— चन्द्रशेखर कपाले



अनुक्रमणिका






श्री. वसंत नारगोलकर

# मुंबइ राज्यांतील जमीन-सुधारणा

जून पंधरा, १९५५ रोजीं मुंबई सरकारनें प्रचलित कूळकायद्यांत कांहीं महत्त्वाच्या सुधारणा करणारें एक विधेयक प्रसिद्ध केलें. त्यावर मुंबई विधिमंडळाच्या पुण्याच्या पावसाळी अधिवेशनांत चर्चा होऊन तें चिकित्सासमितीकडे सोंपविण्यांत आलें. चिकित्सासमितीनें निरनिराळे हितसंबंध लक्षांत घेऊन मूळ विधेयकांत कांहीं उलट-सुलट असे बदल केले. त्यांत पुनः आणखी कांहीं किरकोळ सूचना-उपसूचनांची भर पडून अखेरीला १ ऑक्टोबरच्या सुमारास तें विधेयक विधिमंडळानें संमत केलें. राष्ट्रपतींच्या संमतीनंतर लवकरच त्याला कायद्याचें स्वरूप प्राप्त होऊन त्याच्या अमलबजावणीस सुरवात होईल. मुंबई राज्यांत आज जी जमीनव्यवस्था आहे तिच्यांत या संकल्पित कायद्यानें कांहीं मूलभूत स्वरूपाचे फेरफार घडून येणार असल्यामुळें या कायद्यामुळें ग्रामीण जनतेंत बरीच खळबळ उडाली होती व जवळजवळ दोन–अडीच महिने पर्यंत अनुकूल–प्रतिकूल टीका करणारे लेख, भाषणें व पत्रव्यवहार यांचे द्वारा त्या खळबळीचें प्रतिबिंब निरनिराळ्या वृत्तपत्रांतून उमटत होतें.

विधेयकाचें प्रयोजन सांगण्यासाठीं विधेयकाच्या शेवटीं लिहिलेल्या पुरस्कारांत **महसूलमंत्री श्री. भाऊसाहेब हिरे** यांनीं म्हटलें आहे :

"मुंबई कूळवहिवाट व शेतजमिनींच्या १९४८ च्या कायद्यामध्यें या ज्या दुरुस्त्या करण्यांत येत आहेत त्यामुळें समाजवादी पद्धतीची समाजरचना प्रस्थापित करण्याच्या दिशेनें या राज्यांतील शेतकरी बरीच वाटचाल करूं लागतील असें सरकारला वाटतें. ( जमिनीच्या प्रश्नाच्या बाबतींत ) इतरहि जे कांहीं बदल करण्यांत आले आहेत त्यामागें हीच भावना व धोरण आहे." [ "Government consider, these amendments to the Bombay Tenancy and Agricultural Lands Act, 1948, take the peasantry of this State several steps forward on the road to the achievement of a socialistic pattern of society. This spirit and policy of Government underlie the many other changes that have been introduced." ]

१९४९ पासून १९५५ पर्यंत देशांतील इतर राज्यसरकारांप्रमाणेंच मुंबई सरकारनेंहि कित्येक जुनाट जमीन धारणापद्धती ( land tenures ) नष्ट केल्या हें खरें आहे. परंतु संकल्पित कूळकायद्यामुळें समाजवादी समाजरचना प्रस्थापित करण्याच्या दिशेनें शेतकऱ्यांचें पाऊल पडणार आहे हा जो सरकारचा दावा आहे तो कितपत खरा आहे हा प्रश्न आहे.

---

"What would happen to free India ?" I asked, "What is your programme for the improvement of the lot of the peasantry ?"

"The peasants would take the land" he replied, "We would not have to tell them to take it. They would take it."

"Should the landlords be compensated ?" I asked.

"No," he said, "that would be fiscally impossible" ...... "You see," he smiled, "our gratitude to our millionaire friends does not prevent us from saying such things."

—"A Week With Gandhi." by Louis Fischer








समाजवादी समाजरचना या शब्दप्रयोगालाहि कांहीं निश्चित अर्थ नसल्यामुळें सरकारचा दावा कोणत्या तरी एका निकषावर पडताळून पाहाणेंहि कठिण झालें आहे. परंतु स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वी कॉंग्रेसनें वेळोवेळीं स्वातंत्र्योत्तर सुधारणांबाबत कांहीं घोषणा केल्या होत्या. १९४६ च्या व १९५१ च्या निवडणुकांच्या वेळींहि आपलें आर्थिक व सामाजिक ध्येयधोरण स्पष्ट करणारे जाहीरनामे काढले होते. त्यांच्या अनुरोधानें संकल्पित सुधारणांचें मूल्यमापन करणें शक्य आहे. त्याचप्रमाणें जमीनव्यवस्थेच्या बाबतींत जगांतल्या निरनिराळ्या देशांतून निरनिराळीं धोरणें व कार्यक्रम अंमलांत आणले गेले आहेत; इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटली व अमेरिका आदि साम्यवादी अर्थव्यवस्था नसलेल्या राष्ट्रांतून जमिनीची व्यवस्था बव्हंशीं जुन्याच तत्त्वांनुसार करण्यांत आली आहे. रशिया, चीन, पोलंड, चेकोस्लोवाकिया आदि राष्ट्रांतून मात्र ती अगदीं वेगळी आहे. ही सर्व परिस्थिति लक्षांत घेतली पाहिजे; आणि मुख्य म्हणजे खुद्द भारतांतच १९५१ पासून आचार्य विनोबाजी भावे यांनीं भूदानयज्ञआंदोलनाच्या द्वारा जमिनीच्या व सर्वच मालकी हक्कांच्या कल्पनांबाबत देशांत जी विचारक्रांति सुरू केली आहे तिचीहि दखल घेणें आवश्यक आहे. या सर्व माहितीच्या पार्श्वभूमीवर मुंबई सरकारच्या नव्या कूळकायद्याचें मूल्यमापन केल्यास तें एकांगी ठरणार नाहीं.

मुंबई राज्यांत १९३९ सालीं त्या वेळच्या प्रांतिक कॉंग्रेस – सरकारनें पहिला कूळकायदा केला. त्या कायद्याचा हेतु फारच मर्यादित होता. त्यापूर्वी कुळांना कूळवहिवाटीची जी मुळींच शाश्वती नव्हती ती थोड्याफार प्रमाणांत त्या कायद्यामुळें निर्माण झाली. खंडाचें प्रमाण उत्पन्नाच्या हिश्श्यांत निश्चित झालें; आणि इतर कुळांपेक्षां कांहीं विशिष्ट हक्क अधिक असलेला 'संरक्षित कुळांचा' एक नवीन वर्ग निर्माण झाला. जमीनमालकांचे हक्क सुरक्षित करणारीं कांहीं कलमेंहि त्यांत होतीं. विशेषतः बिगरशेतकीच्या कामासाठीं किंवा स्वतः कसण्यासाठीं जमीनमालकाला जमीन हवी असल्यास संरक्षित कुळालासुद्धां जमिनीवरून काढण्याची तरतूद सरकारनें त्या कायद्यांत केली होती. १९४८ सालीं जुन्या कायद्यांत कांहीं सुधारणा करण्यांत आल्या व त्याची व्याप्ति वाढविण्यांत आली. कुळें व जमीनमालक यांचे संबंध नियंत्रित करणें हाच जुन्या कूळकायद्याचा प्रमुख उद्देश होता. कांहीं विशिष्ट परिस्थितींत जमीनमालकांच्या जमिनी सरकारी व्यवस्थेखालीं घेणें व शेतजमिनींच्या हस्तांतरांवर निर्बंध घालणें वगैरे नव्या तरतुदींची १९४८ च्या कायद्यांत भर घालण्यांत आली. खंडाचें प्रमाण उत्तरोत्तर कमी करण्याकडेहि सरकारचा कल होता. आपल्या ताब्यांतील जमिनी जमीनमालकांकडून त्यांच्या इच्छेविरुद्धहि विकत घेण्याचा एक नवीन अधिकार संरक्षित कुळांना देण्यांत आला होता. परंतु फारच थोडीं कुळें त्याचा फायदा घेण्याच्या परिस्थितींत होतीं असें नंतर आढळून आलें. १९५२ सालीं कूळकायद्यांत पुनः आणखी कांहीं दुरुस्त्या करण्यांत आल्या.

आतांच्या नवीन कूळकायद्यांतील सर्वांत मोठें आकर्षण म्हणजे १ एप्रिल १९५७ हा दिवस 'कसणाऱ्यांचा दिवस' (Tillers' Day) म्हणून साजरा करण्याची योजना! कायम कुळें, संरक्षित कुळें व दशवार्षिक कुळें असे आज कुळांचे तीन प्रकार आहेत. १ एप्रिल १९५७ रोजीं तिन्ही प्रकारचीं हीं कुळें आपापल्या जमिनीचे मालक होतील असें जाहीर करण्यांत येणार आहे. त्यानंतर या कामासाठीं खास नेमलेलें ट्रायब्यूनल प्रत्येक कुळाच्या ताब्यांतील जमिनीची किंमत नेमून देईल. किंमत धाऱ्याच्या २० पटींपासून ते २०० पटींपर्यंत असेल. ट्रायब्यूनल् कुळाला किंमत एक-रकमी अगर जास्तींत जास्त १२ वार्षिक हप्त्यांनीं भरण्यास सांगू शकेल. कांहीं विशिष्ट अडचणींच्या वेळीं हे हप्ते १२ चे ऐवजीं १६ करून मागण्याची सवलत कुळाला देण्यांत आली आहे. कायम कुळांच्या बाबतींत मात्र किंमत धाऱ्याच्या नव्हे तर, खंडाच्या सहापट रकमेइतकी ठरविण्यांत आली आहे व ती एक-रकमीच भरावयाची आहे. ज्या कुळांची अशा रीतीनें जमीन खरीदण्याची इच्छा अगर ऐपत नसेल अगर इच्छा असूनहि ज्यांच्याकडे चार वार्षिक हप्त्यांइतकी रकम बाकी राहील त्या कुळांना जमिनीवरून हुसकून लावण्याची तरतूद या कायद्यांत करण्यांत आली आहे! शिवाय जमीनखरेदीच्या या नियमाला एक मोठा








अपवाद ठेवण्यांत आला आहे. ज्या छोट्या जमीनमालकांची जमीन किफायतशीर क्षेत्राइतकी अगर त्याहूनहि कमी असेल आणि ज्यांनें खंडासहित वार्षिक उत्पन्न १५०० रुपयांपेक्षां कमी असेल त्यांची जमीन विकत घेण्याचा त्यांच्या कुळांना अधिकार नाहीं. याचा अर्थ असा कीं, लहान खातेदार पूर्वीप्रमाणेंच आपापल्या जमिनींचे मालक राहातील व त्यांना त्यांच्या कुळांकडून नवीन ठरविण्यांत येणाऱ्या खंडाच्या प्रमाणानुसार दरवर्षी खंड मिळत राहील. विधवा, अपंग, अज्ञान इत्यादिकांच्या जमिनीवर जीं कुळें असतील त्यांनासुद्धां १ एप्रिल १९५७ रोजीं आपापल्या जमिनी खरेदी करतां येणार नाहींत !

जमीनधारणेच्या क्षेत्राचे दोन प्रकार कल्पिण्यांत आले आहेत व अशा रीतीनें किमान व कमाल क्षेत्राच्या मर्यादा ठरवून देण्याचा कांहींसा नवीन उपक्रम सुरूं करण्यांत आला आहे. जिरायत जमिनीच्या बाबतींत १२ एकर, हंगामी पाण्याखालील अगर भातशेतीच्या जमिनीच्या बाबतींत ८ एकर व बारमाही पाण्याखालील जमिनीच्या बाबतींत ४ एकर म्हणजे 'किफायतशीर क्षेत्र' ( economic holding ) असें ठरविण्यांत आलें आहे. या प्रत्येक प्रकारच्या जमिनीच्या तिप्पट क्षेत्राला 'कमाल क्षेत्र' ( ceiling area ) असें नांव देण्यांत आलें आहे. १५ जून १९५५ नंतर जमीनमालक अगर कूळ म्हणून कोणींहि ठरवून दिलेल्या कमाल क्षेत्रापेक्षां अधिक जमीन स्वतःजवळ ठेवली तर तें कृत्य बेकायदेशीर ठरेल. परंतु त्या ठरवून दिलेल्या दिवसानंतर कायद्यानें मान्य केलेल्या कांहीं ठराविक वारसां-( recognized heirs ) ना वारसा हक्कानें अगर मृत्युपत्रानें मिळणाऱ्या जमिनीला हा निर्बंध लागू होणार नाहीं. तसेंच 'स्वतः कसणें' या शब्दाची जी नवीन व्याख्या करण्यांत आली आहे त्या व्याख्येनुसार १५ जून १९५५ पूर्वीच ज्यांच्याजवळ कमाल मर्यादेपेक्षां अधिक जमीन घर-लागवडीखालीं होती त्यांनाहि हा निर्बंध बाधक नाहीं ! 'स्वतः कसणें' या शब्दाच्या नवीन व्याख्येनुसार एकाद्या जमीनमालकाची जमीन ९६ एकरांपेक्षां जास्त असली परंतु ती जर एकाच खेडेगांवाच्या हद्दींत असली तर ती 'स्वतःच कसली' जात आहे असें समजलें जाईल. त्याचप्रमाणें ९६ एकरांपेक्षां जास्त असलेली जमीन दोन किंवा अधिक खेड्यांत विभागली गेली असली परंतु तिचा कोणताहि एक तुकडा दुसऱ्या तुकड्यापासून पांच मैलांच्या आंत असला तरी कमाल मर्यादेचें नियंत्रण तिला लागू होणार नाहीं. शिवाय, एकाद्या जमीनमालकाची जमीन ९६ एकरांपेक्षां अधिक असली आणि जरी ती दोनतीन खेड्यांच्या हद्दीवर असली तरी ती जर एका सघन गटा-( compact block ) मध्यें असेल तरी ती स्वतः कसली जात आहे असेंच मानलें जाईल. ९६ एकरांपेक्षां कमी जमीन असली तर मग ती कुठेंहि कशीहि विखुरलेली असली तरी ती 'स्वतः कसली' जात आहे असें समजलें जाईल. 'शेती'-( agriculture ) च्या व्याख्येंतहि थोडा बदल करण्यांत आला आहे व शेतींतून दुग्धव्यवसाय, कुक्कुटपालन, पशुसंवर्धन वगैरे जोडधंदे वगळण्यांत आले आहेत.

आदिवासी विभाग वगळून आज राज्यांत सर्वत्र खंडाचें प्रमाण उत्पन्नाचा सहावा भाग ठरलेलें आहे तें बदलून, तें जास्तींत जास्त धान्याच्या पांच पटींपर्यंत ठरविण्यांत आलें आहे. कुळानें खंड न भरल्यास अगर जमिनीची पोटविभागणी, नुकसान वगैरे केल्यास त्याला नोटीस देऊन काढून टाकतां येण्याची पूर्वीचीच तरतूद थोड्याफार फरकानें कायम ठरविण्यांत आली आहे. जमीनमालकाला जमीन स्वतः कसावयाची असेल अगर त्याला ती बिगरशेतीच्या कामासाठीं उपयोगांत आणावयाची असेल तर त्यानें ३१ डिसेंबर १९५६ च्या आंत कुळाला तशी नोटीस दिली पाहिजे व ३१ मार्च १९५७ च्या आंत जमिनीचा कब्जा मिळवण्याबाबत मामलेदाराकडे अर्ज केला पाहिजे. त्या मुदतीनंतर विधवा, अपंग, अज्ञान इत्यादीं– शिवाय कोणाहि जमीनमालकाला कुळाकडील आपली जमीन काढून घेतां यावयाची नाहीं. कुळांकडील जमीन काढून घेऊं पाहाणाऱ्या जमीनमालकावर जीं कांहीं बंधनें घातलीं आहेत त्यांत त्याचें उपजीविकेचें मुख्य साधन शेती हेंच असलें पाहिजे व त्याच्याकडे कमाल मर्यादेपेक्षां जमीन अधिक असतां कामां नये किंवा ती तशी होतां कामां नये – अशीं दोन बंधनें आहेत. शिवाय कुळाकडे असलेल्या एकूण जमिनींपैकीं








निम्मी तरी जमीन त्याच्याकडे राहिली पाहिजे अशीहि एक अट आहे.

कायद्यांतील निर्बंधामुळें मालक अगर कूळ म्हणून जी जमीन स्वतःकडे ठेवणें बेकायदेशीर ठरेल अशी सर्व जमीन जमीनमालकांनीं सरकारच्या ताब्यांत द्यावयाची आहे. नंतर कलेक्टरमार्फत एका विशिष्ट अग्रक्रमणिके ( priority list ) प्रमाणें तिचें वितरण करण्यांत येईल. या यादींत शेतमजुरांना व भूमिहीन व्यक्तींना जमीन खरीदण्याचा प्रथम हक्क देण्यांत आलेला आहे. ज्याप्रमाणें लागवडीची जमीन विकत घेण्याची कुळांवर सक्ती करण्यांत आली आहे त्याचप्रमाणें कुळांचीं घरें ज्या जागीं आहेत ती जागा विकत घेण्याची सक्ती करण्याचा एक नवा अधिकार सरकारनें आपल्याकडे घेतलेला आहे. हा कायदा अंमलांत आल्यानंतर जमिनीची कोणी बेकायदेशीर विक्री केली तर ती रद्द समजली जाईल इतकेंच नव्हे तर ती जमीन सरकार आपल्या ताब्यांत घेईल व वर उल्लेखिलेल्या अतिरिक्त जमिनींप्रमाणें तिची विल्हेवाट लावून येणारे किंमतीचे पैसे सरकार जप्त करील. हा कायदा कारखाने किंवा व्यापारी संस्था यांच्याकडे खंडानें असलेल्या जमिनींना किंवा ऊस आणि अन्य कांहीं पिकें याखालीं असलेल्या जमिनींना बंधनकारक नाहीं. बृहन्मुंबई अथवा अन्य नगरपालिकांच्या हद्दींत असणाऱ्या जमिनींनाहि या कायद्याचीं कांहीं कलमें लागू होणार नाहींत.

नवीन कायद्यांतील कांहीं महत्त्वाच्या कलमांचा गोषवारा वर दिला. १९३९च्या पहिल्या कूळकायद्यापेक्षां संकल्पित कायद्यांतील उद्दिष्टांची व्याप्ति पुष्कळच वाढली आहे असें दिसून येतें. १९३१च्या कराची कॉंग्रेसपासून तों अगदीं अलीकडच्या कॉंग्रेस अधिवेशनापर्यंत सरकार व कसणारा यांमधील मध्यस्थ ( intermediary ) नष्ट करण्याच्या धोरणाचा पुरस्कार कॉंग्रेसनें वारंवार केला आहे. १९३६ च्या, १९४६ च्या व १९५१ च्या निवडणुकांच्या वेळीं कॉंग्रेसनें जे जाहीरनामे काढले त्यांतहि जमिनीच्या प्रश्नाचा उत्तरोत्तर अधिक सविस्तर व अधिक स्पष्ट असा उल्लेख आढळतो. परंतु प्रत्येक ठरावांतील अथवा जाहीरनाम्यांतील भाषा मात्र जाणूनबुजून संदिग्ध ठेवण्यांत आली आहे. त्यांत मुत्सद्दीपणा होता. स्वातंत्र्यप्राप्तीच्या पूर्वीच्या काळांत जनतेच्या निरनिराळ्या विभागांच्या हितसंबंधांमध्यें जे अंतर्विरोध होते ते त्यावेळीं स्पष्ट करण्यानें स्वातंत्र्यलढ्यांत आवश्यक असणारें राष्ट्रीय ऐक्य टिकलें नसतें. स्वातंत्र्योत्तर कालांतहि कॉंग्रेस जमीनसुधारणांबाबत कोणतेंहि क्रांतिकारक पाऊल टाकूं शकत नव्हती. सरकार व कसणारा यांमधील मध्यस्थ नष्ट करण्याचें आपलें अभिवचन मात्र मालगुजारी, जमीनदारी, खोती इत्यादि जुनाट जमीनधारणापद्धति नष्ट करून कॉंग्रेसनें खरें करीत आणलें आहे. यापेक्षां अधिक क्रांतिकारक पाऊल कॉंग्रेस टाकूं शकत नव्हती याचें कारण निवडणुकांमध्यें यश मिळण्यासाठीं कॉंग्रेस या खंडप्राय देशांतील लक्षावधि खेड्यांतील जनतेवर वजन असणाऱ्या सधन जमीनमालकांच्या पाठिंब्यावर अवलंबून होती. विधिमंडळांत निवडून गेलेले लोकप्रतिनिधी हे देशांतील मागासलेल्या किंवा दरिद्री जनतेचे कैवारी नाहींत. आर्थिक क्रांतीच्या दृष्टीनें कोणतेंहि पुढचें पाऊल टाकण्यापूर्वी आपल्या हितसंबंधांना, देशकालपरिस्थिति लक्षांत घेतां, कमींत कमी धक्का कसा लागेल हें ते जागरूकतेनें पाहात असतात. भारतीय घटना घडवीत असतांना ही गोष्ट स्पष्ट झाली होतीच. त्यानंतर राज्याराज्यांतील जमीनविषयक कायदे होत असतांना तर ती अधिकच स्पष्ट झाली आहे.

‘ कसेल त्याची जमीन ’ या घोषणेचा अर्थ कॉंग्रेसनें कधींहि स्पष्ट केला नाहीं किंवा अंततोगत्वा आपल्याला कोणती जमीनव्यवस्था अभिप्रेत आहे याचें चित्र कधीं जनतेपुढें ठेवलें नाहीं. सर्वसामान्यपणें जो कूळ म्हणून आज जमीन कशीत आहे त्याला किंवा शेतांत शेतमजूर म्हणून जो आज राबत आहे त्याला जमिनीचा मालक करावयाचें हा ‘कसेल त्याची जमीन’ या घोषणेचा अर्थ गृहीत धरला जातो; इतकेंच नव्हे तर या लेखाच्या प्रारंभीं गांधीजींचे उद्गार उद्धृत केले आहेत त्यांत सूचित केल्याप्रमाणें जमिनींचें हस्तांतर विनामोबदला झालें पाहिजे असेंहि पुरोगामी विचारवंतांचें मत आहे. कारण जे आज जमिनीचे मालक आहेत त्यांनीं आजपर्यंत कुळांच्या किंवा शेतमजुरांच्या श्रमाचें पुष्कळसें फळ स्वतः उपभोगिलें आहे. म्हणून त्यांना जमिनीचा मोबदला देणें न्यायोचित होणार नाहीं. परंतु घटना घडवितांनाच मुळीं याबाबतींत ३१ व्या कलमाअन्वयें मोबदला दिल्याशिवाय कोणाचीहि माल-








मत्ता काढून घेतली जाणार नाहीं असें आश्वासन घटनासमितींत बहुमत असलेल्या कॉंग्रेसनें देऊन टाकलें. एवढी गोष्ट खरी कीं कॉंग्रेसनें कधीं बेजबाबदारपणें जहाल कार्यक्रमाच्या घोषणा केल्या नाहींत. ' कसेल त्याची जमीन ' याचा अर्थ कुळें व शेतमजूर यांमध्यें जमीन विनामूल्य वांटली जाईल असा आम्ही करीत नाहीं असें नुकतेंच कूळकायदा–दुरुस्ती–विधेयकावर मुंबई विधिमंडळांत चर्चा चालू असतांना महसूल मंत्री श्री. भाऊसाहेब हिरे यांनीं सांगितलें. परंतु शेतीव्यवस्थेंतील अत्यंत शोषित व पीडित अशा वर्गाच्या अपेक्षा कॉंग्रेसनेंच पूर्वीपासून वाढवून ठेवल्या होत्या. अलीकडे म्हणजे १९५१ सालीं दिल्लीला भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांतील एका ठरावांत खालील मार्गदर्शक सूत्र आढळतें :

" जमीन हा भारतीय अर्थव्यवस्थेचा पाया आहे. जे श्रम करतात त्यांनाच आपल्या श्रमाचें फळ उपभोगण्यास मिळेल. आणि समाजाकरितां संपत्ति निर्माण करण्याचें साधन म्हणून जमिनीचा वापर केला जाईल अशा रीतीनें शेतजमिनींची व्यवस्था लावण्यांत आली पाहिजे. " (' Land is the base of India's economy. The agrarian system should be so organized that the fruits of labour are enjoyed by those who toil and land is worked as a source of wealth for the community. ')

यानंतर १९५३ मध्यें आग्रा येथें जमीनमालकीवर कमाल मर्यादेचें नियंत्रण घालण्याची सूचना करणारा एक ठराव कॉंग्रेसनें केला होता. त्यांतील महत्त्वाचा भाग खालीलप्रमाणें होता :

" शक्य तोंवर भूमिहीन शेतमजुरांमध्यें जमिनीची फेरवांटणी करण्यासाठीं जमिनींबाबतची आवश्यक ती आंकडेवारी गोळा करण्याबाबत व जमीन–धारणेची कमाल मर्यादा ठरविण्याबाबत राज्यसरकारांनीं जरुर ती उपाययोजना त्वरित करावी. " (' The State governments should take immediate steps in regard to the collection of the requisite land-data and the fixation of ceilings on land-holdings with a view to redistribute land, as far as possible, among landless workers. ')

श्रम करणाऱ्याला त्याच्या श्रमाचें फळ मिळालें पाहिजे, व शक्य तों भूमिहीन मजुरांमध्यें जमीन-वांटप केलें पाहिजे–हीं दोन उद्दिष्टें या ठरावांनीं घालून दिलीं आहेत. आतांपर्यंत शिफारसवजा असे अनेक ठराव कॉंग्रेसनें केले आहेत. परंतु त्या ठरावांबरहुकूम अमुक एका मुदतींत जमीनसुधारणांचा कार्यक्रम पार पाडलाच पाहिजे असें बंधन राज्यसरकारांवर नाहीं. त्यामुळें ठरावांमुळें श्रमजीवी जनतेमध्यें निर्माण झालेल्या अपेक्षा अजूनहि पुऱ्या झाल्या नाहींत. इतर राज्यांशीं तुलना केल्यास जमिनीच्या कायद्यांच्या बाबतींत मात्र मुंबई राज्यच थोडें पुरोगामी आहे असें दिसून येतें.

तथापि, जमीन-सुधारणांबाबत वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या कॉंग्रेसच्या ध्येयधोरणाचें सिंहावलोकन केल्यावर, मुंबई – राज्यांतील जमीनव्यवस्थेवर या कायद्याचे होणारे संभाव्य परिणाम लक्षांत घेतल्यावर नवीन कूळकायदा क्रांतिकारक आहे किंवा तो शेतकऱ्यांना समाजवादी समाजरचनेकडे नेणारा आहे असें कोणी म्हटलें तर तें समर्थनीय ठरणार नाहीं. नवीन कायदा अंमलांत येण्यापूर्वी, जुन्या कायद्याप्रमाणें कायदा अंमलांत येईल त्या तारखेपासून ३१ डिसेंबर १९५६ पर्यंत आणि १ एप्रिल १९५७ नंतर सुद्धां या नाहीं त्या कारणांसाठीं कुळांच्या बेदखलीचें आज चालू असलेलें सत्र कायमच राहाणार ही गोष्ट निर्विवाद आहे. कुळाला जमिनीवरून काढून टाकण्याच्या सर्व तरतुदींच्या तडाख्यांतून जीं कुळें वांचतील तींच कुळें जमिनीचीं मालक होऊं शकतील. लहान खातेदारांच्या जमिनीवरील कुळें मालक होणार नाहींत याचा उल्लेख पूर्वीं आलेला आहेच. राज्यामध्यें लागवडीलायक जमीन ४ कोटि १० लाख एकर आहे. मुंबईराज्य हा रयतवारी प्रदेश असल्यामुळें स्वतः राबणाऱ्या शेतकऱ्यांची संख्या मोठी आहे. तरीसुद्धां खालीं दिलेल्या










आंकड्यावरून मुंबई-राज्यांत जमीन धारणेच्या प्रमाणांत किती विषमता आहे हें दिसून येतें.

याचा अर्थ असा कीं ९२ टक्के खातेदारांजवळ सुमारें २॥ कोटी एकर जमीन आहे तर फक्त ८ टक्के लोकांजवळ जवळजवळ १॥ कोटि एकर जमीन आहे! १० एकरांच्या वर कोणाजवळ जमीन ठेवावयाची नाहीं असें ठरविलें तर १॥ कोटि एकर जमीन वांटपाकरितां उपलब्ध होईल. परंतु असें कांहीं करण्याचा सरकारचा इरादा नाहीं; इतकेंच नव्हे तर पुढील वर्षदीड-वर्षांत कुळांची जी बेदखली होणार आहे व त्यामुळें ग्रामीण विभागांत जो असंतोष निर्माण होण्याचा संभव आहे त्याची सरकारला जाणीव असून सरकारनें कुळांच्या पुनर्वसनासाठीं कांहींहि योजना आंखलेली नाहीं. उलट, या कायद्यांत ४८ एकरांच्या कमाल क्षेत्रापेक्षां जास्त जमीन 'स्वतः कसण्यासाठीं' स्वतःकडे ठेवण्याबाबत बड्या जमीनमालकांना बऱ्याच सवलती देण्यांत आल्या आहेत. त्यामुळें शेंकडों एकर जमीन ही १५ जून १९५५ नंतरहि अशा सधन शेतकऱ्यांकडेच राहाणार आहे.

गरीब भूमिहीन शेतमजूरांचा तर या कायद्यांत मुळींच विचार करण्यांत आलेला नाहीं ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे. कुळांनीं किंमत न भरल्यामुळें, एखाद्या जमिनीची विक्री बेकायदेशीर ठरल्यामुळें अथवा 'स्वतः कसणें' या शब्दप्रयोगाच्या नव्या व्याख्येमुळें ज्या जमीनमालकांची जमीन वांटपासाठीं सरकारच्या ताब्यांत येणार आहे ती जमीन गरीब भूमिहीनांकडे अथवा शेतमजुरांकडे जाणार नाहीं हें उघड आहे. कारण अशा जमिनींची किंमत मामलेदार ठरवून देणार आणि अग्रक्रमाप्रमाणें ज्याला ती जमीन विकत घेण्याचा अधिकार प्राप्त होईल त्यानें किंमतीची रक्कम फक्त सहाच वार्षिक हप्त्यांत भरावयाची आहे. कुळानें आपल्या जमिनीची किंमत बारा ते सोळा हप्त्यानीं भरावयाची आहे हें मागें आलेंच आहे. अर्थात् सहा वार्षिक हप्त्यांनीं जमिनीची किंमत भरणाऱ्या 'भूमिहीन व्यक्ति' सधनच असणार हें उघड आहे.

'कसणाऱ्यांचा दिवस' साजरा करण्याची योजना खरोखरीच अपूर्व आहे. किती कुळें जमीन खरेदी करूं शकतील आणि किती जणांची जमिनींवरून हकालपट्टी होईल याचा निश्चित अंदाज आज करणें कठिण आहे. कारण जमिनीच्या किंमतीच्या ज्या किमान व कमाल मर्यादा या कायद्यानें घालून दिल्या आहेत त्यांमध्यें बरेंच अंतर आहे व जिल्ह्यांजिल्ह्यांतून परिस्थितिहि वेगळी आहे. परंतु या योजनेमुळें सुमारें १०० ते १५० कोटि रुपयांची उलाढाल होईल असें वाटतें. जे आज जमिनीवर श्रम करीत आहेत त्यांना अधिक श्रम करण्यास लावून त्यांचेकडून ही शंभरदीडशें कोटि रुपयांची रक्कम अनेक वर्षें श्रम न करतां जमिनीचें उत्पन्न उपभोगीत आलेल्या जमीनमालकांना देण्यास भाग पाडणारा हा कायदा क्रांतिकारक कसा तें लक्षांत येत नाहीं. या कायद्यामुळें पुढील दोन-अडीच वर्षें अनेक कायदेशीर कटकटी व कज्जे निर्माण होणार आहेत. कुळें व जमीनमालक आपापला स्वार्थ साधण्यासाठीं अनेक लटपटी व खटपटी करतील, लांचलुचपतीला आणखी ऊत येईल. जमिनीची किंमत सावकाश बारा किंवा सोळा हप्त्यांनीं मिळणार किंवा पुढच्या बदलल्या जमान्यांत कदाचित् ती मुळींच मिळणार नाहीं. अशा परिस्थितींत मिळेल ती रक्कम कुळांकडून खाजगी रीत्या वसूल करण्याचे जमीनमालकांचे प्रयत्न एव्हांपासूनच सुरू झालेले आहेत. कुळांनीं जमिनीच्या किंमती भरूं नयेत व जमिनीहि सोडूं नयेत असा कुळांना कोणीं सल्ला दिला व त्यांना त्या पायावर

१ खालील आंकडे मध्यवर्ति सरकारच्या 'अखिल-भारतीय-शेतमजूर चौकशी समिती'च्या अहवाला-( All India Agricultural Labour Enquiry Report ) वरून तयार करून घेतले आहेत :

| गट | खातेदारांच्या संख्येशीं प्रमाण | लागवडीलायक जमिनीच्या क्षेत्राशीं प्रमाण | जमीन ( एकर ) |
|---|---|---|---|
| १०·१ एकरापर्यंत | ९२·० | ६१·९ | २,५४,२९,४४७ |
| २५·१ ,, | ६·० | २२·० | ९०,३७,९३० |
| ५० एकरांच्यावर | २·० | १६·१ | ६६,१४,१२१ |
| | १००·० | १००·० | ४,१०,८१,४९८ |







संघटित केलें तर गंभीर परिस्थिति उद्भवेल. पुढील निवडणुका जानेवारी १९५७ च्या सुमारास होणार. त्याच वेळीं विरोधी पक्ष कूळकायद्याविरुद्ध आघाडी उघडतील असा संभव आहे. अर्थात् सरकार कोणत्याहि परिस्थितीला तोंड देण्यास समर्थ आहे असें महसूल-मंत्र्यांनीं विधिमंडळांत जाहीर करून ठेवलेंच आहे.

इंग्लंड-फ्रान्ससारख्या देशांतून कुळांना संरक्षण देणारे कायदे गेल्या शतकाच्या अखेरीपासूनच करण्यांत येऊं लागले. परंतु तेथील कूळकायद्यांचें उद्दिष्ट कूळ व मालक यांचे संबंध नियंत्रित करून प्रचलित भांडवलदारी अर्थव्यवस्थेच्या चौकटींत कुळांना कांहीं विवक्षित न्याय मिळवून देण्याचें होतें. कुळांना कायद्यानें मालकी हक्क देण्यापर्यंत त्या कायद्यांची कधींच मजल गेली नाहीं. याच्या उलट रशिया, चीन आदि देशांतून जमीनदारी व जमिनीची खाजगी मालकी विनामोबदला नष्ट करण्यांत आली. उत्पादन हें खाजगी नफ्यासाठीं करावयाचें नसून तें गरजा भागविण्यासाठीं झालें पाहिजे आणि म्हणून देशांतील संपत्ति व उत्पादनसाधनें यांवर व्यक्तिगत मालकी असतां कामा नये-या व अशा सिद्धान्तांवर परंतु हिंसेच्या व हुकूमशाहीच्या मार्गानें जमिनीचा प्रश्न सोडविण्याचे प्रयोग तेथें करण्यांत आले. त्या प्रयोगांचा अखेरचा निष्कर्ष अजून जगासमोर यावयाचा आहे. लोकशाही मार्गानें हा प्रश्न सोडवावयाचा म्हटला कीं त्यांत कांहीं अडचणी उद्भवतात हें कांहीं अंशीं खरें आहे. परंतु लोकशाहींतहि प्रस्थापित हितसंबंधांचें दडपण न जुमानतां पुरोगामी कायदे करण्याचें धैर्य असणाऱ्यांना, हातीं सत्ता असेल, तर आर्थिक समता प्रस्थापित करण्याच्या दृष्टीनें झपाट्यानें बदल घडवून आणतां येतील. लोकशाही म्हणजे दिरंगाई किंवा सुधारणांची हतेबंदी असा सत्तारूढ कॉंग्रेसनें अर्थ केला आहे. समाजरचनेंत फार मोठा फरक एकदम केला तर ती हिंसा होईल असाहि एक गैरसमज उच्चपदस्थ कॉंग्रेसजनांमध्यें आढळून येतो. जगन्नाथपुरीच्या सर्वोदय-संमेलनांत विनोबाजींनीं या बाबतींत अत्यंत स्पष्ट मार्गदर्शन केलें आहे. ते म्हणाले, "अहिंसेचा अर्थ कमींत कमी वेगानें, समाजाला फारसा त्रास न होऊं देतां पुढें जाणें असा केला तर तो अर्थ अहिंसेच्या हिताचा नाहीं, हिंसेच्या हिताचा आहे ... ... अहिंसेचा अर्थ जर इतका मृदु, गुळगुळीत, निर्वीर्य केला तर त्यानें विरोधी शक्ति, हिंसक शक्ति, आमची इच्छा नसतांना, वाढतील." १९३९ पासून कूळकायद्यांत वेळोवेळीं जुजबी सुधारणा करीत जमिनीचा प्रश्न सोडवूं पाहणाऱ्या मुंबई सरकारनें या इशाऱ्याची दखल घेणें आतां अत्यंत आवश्यक झालें आहे.

हिंसेचा व अंतर्गत यादवीचा मार्ग अनेक दृष्टींनीं अनिष्ट म्हणून तो त्याज्य आहे. परंतु जमिनीच्या प्रश्नाच्या बाबतींत कॉंग्रेसनें जें धोरण स्वीकारलें त्यामुळें लोकशाही कायद्याचा मार्गहि निष्प्रभ ठरूं पाहात होता. अशा परिस्थितींत विनोबाजींना भूदानयज्ञाची प्रेरणा झाल्यामुळें देशांत हिंसेच्या मार्गाची प्रतिष्ठा कमी झाली. गेलीं चार-साडेचार वर्षें अत्यंत अहिंसात्मक पद्धतीनें परंतु अत्यंत क्रांतिकारक विचार भूदानयज्ञ-आंदोलनाच्या द्वारा देशांत प्रसृत होऊं लागल्यानें जमीन-सुधारणा करण्यास अतिशय अनुकूल असें वातावरण निर्माण झालें आहे. वैयक्तिक मालकी हक्काचें विसर्जन करणें, भूमिहीनांना जमिनीसारखें हक्काचें उपजीविकेचें साधन उपलब्ध करून देणें व अहिंसात्मक प्रक्रियेचें औचित्य व सामर्थ्य जनतेच्या लक्षांत आणून देणें हीं भूदानयज्ञ-चळवळीचीं तीन प्रमुख तात्कालिक उद्दिष्टें आहेत. भूदानयज्ञ यशस्वी झाल्यास समता, बंधुता, स्वावलंबन व सहकार यांची गांवांगांवांतून स्थापना झालेली दिसेल. अर्थातच अहिंसात्मक प्रक्रियेंत सुप्त असलेलें हें प्रचंड सामर्थ्य कूळकायद्यानें घडवून आणलें. जमीन-मालकीच्या हस्तांतरांत नाहीं हें सांगावयास नकोच. कूळकायद्याची भूदानयज्ञाशीं तुलना एवढ्यासाठीं करावयाची कीं खऱ्याखुऱ्या क्रांतिविचाराचें सम्यग् दर्शन झाल्यानें कायद्यानें क्रांति घडवून आणूं पाहाणाऱ्यांना आपल्या प्रयत्नांच्या अपुरेपणाचें यथार्थ दर्शन व्हावें. या दृष्टीनें विचार केल्यास मुंबई सरकारचा नवीन कूळकायदा सर्वच दृष्टींनीं अत्यंत अपुरा व असमाधानकारक आहे हें उघड होईल.

---

## राज्यपुनर्रचनामंडळाच्या शिफारशींबाबत महाराष्ट्र काँग्रेस कमिटीचा ठराव

**महाराष्ट्रप्रदेश काँग्रेस कमिटीनें पुणें येथें ता. २१ ऑक्टोबर १९५५ ठराव पास केला :**

" महाराष्ट्र प्रदेश-काँग्रेस-कमिटीनें राज्यपुनर्रचना-मंडळाच्या शिफारशींचा, विशेषतः मुंबई राजधानीसह संयुक्त महाराष्ट्र बनविण्यांत यावा या मराठीभाषी लोकांच्या मागणीबाबत त्या मंडळानें ज्या शिफारशी केल्या आहेत त्यांचा काळजीपूर्वक विचार केला. म. प्र. कॉं. कमिटीला खेदानें म्हणावें लागत आहे कीं, रा. पु. मंडळाचा संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीबाबतचा दृष्टिकोन निःपक्षपाती नाहीं आणि त्या मंडळानें आपले निष्कर्ष म्हणून पुढें मांडलेल्या सूचनाहि मराठीभाषी जनतेला न्याय्य नाहींत. म्हणून, रा. पु. मंडळानें मुंबई राज्य हें द्वैभाषिक राज्य करावें ही जी सूचना केली आहे, तिला म. प्र. कॉं. कमिटीचा नकार आहे.

" कॉंग्रेसच्या कार्यकारिणीनें ऑक्टोबर १४ ला जो ठराव पास केला त्या ठरावानुसार कॉंग्रेसच्या अध्यक्षांनीं म. प्र. कॉं. कमिटीच्या अध्यक्षांना आणि महाराष्ट्रांतील इतर महत्त्वाच्या व्यक्तींना आपण स्वतः, श्री. नेहरू व त्यांचे इतर सहकारी यांच्याशीं मनमोकळी चर्चा करण्याकरितां निमंत्रण दिलें. सगळयांचीं प्रत्येकीं मतें समजून यावींत आणि यांतून सर्वांना स्वीकार्य अशी तोड शक्य तर शोधून काढतां यावी हा या चर्चेकरितां बोलावण्यामागील हेतु होता.

" चर्चेची ही संधि मिळाली याबद्दल म. प्र. कॉं. कमिटीस कृतज्ञता वाटत असून, जीं बोलणीं झालीं तीं सदिच्छायुक्त आणि बंधुभावपूर्ण वातावरणांत पार पडलीं याचें म. प्र. कॉं. कमिटीस समाधान वाटतें. या चर्चेमध्यें, कॉंग्रेसचे अध्यक्ष, श्री. नेहरू आणि त्यांचे सहकारी यांनीं मराठीभाषी लोकांचा उच्च हेतु आणि न्याय्य आकांक्षा यांचें महत्त्व आम्हीं पूर्णपणें जाणतों असें महाराष्ट्र-प्रतिनिधीस आश्वासन दिलें याबद्दल म. प्र. कॉं. कमिटीस आनंद वाटतो.

" चर्चा चालूं असतांना, संयुक्त महाराष्ट्राची मागणी तावडतोब स्वीकारण्याच्या मार्गांत कांहीं अडचणी असून व्यापक देशहित लक्षांत घेणें आवश्यक आहे या गोष्टींवर पुढाऱ्यांनीं भर दिला आणि पुढें अशी सूचना मांडली कीं ( १ ) महागुजरातचें एक राज्य ( २ ) मराठवाडा व विदर्भ धरून पण मुंबई शहर वगळून संयुक्त महाराष्ट्राचें एक राज्य अशीं व्हावींत, तसेंच मुंबई शहर हें स्वतंत्र ठेवलें जावें व पांच वर्षांनंतर त्यानें संयुक्त महाराष्ट्रांत सामील व्हायचें कीं स्वतंत्र म्हणूनच रहावयाचें हें ठरविण्याची त्यास मुभा असावी.

"शांतता, ऐक्य व सदिच्छा यांना बाध न येतां हा प्रश्न सुटावा याकरितां राष्ट्रसेवेप्रीत्यर्थ आपण आपलें व मराठीभाषी लोकांचें सहकार्य द्यावें अशी महाराष्ट्रीय प्रतिनिधी आणि त्यांचे नेते श्री. शंकरराव देव यांची कळकळीची इच्छा होती. म्हणून पुढाऱ्यांच्या आवाहनाला प्रतिसाद म्हणून, महाराष्ट्रप्रतिनिधींनीं सूचना मांडली ती अशी : सर्व मराठीभाषी प्रदेश आणि सर्व गुजरातीभाषी प्रदेश यांचें एक संयुक्त राज्य मुंबई राजधानी ठेवून बनविलें जावें; हें संयुक्त राज्य यशस्वी व्हावें याकरितां प्रामाणिकपणें व कळकळीनें त्या संयुक्त राज्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी व्हावी. पांच वर्षांनंतर जर महागुजरातच्या लोकांना आपण बाहेर पडावें, आपण आपलें स्वतःचें एक स्वतंत्र राज्य बनवावें असें वाटलें तर तसें करण्यास त्यांना मुभा असावी.

"श्री. नेहरू आणि त्यांचे सहकारी यांनीं जी सूचना केली तिचा म. प्र. कॉं. कमटीनें मोठ्या आस्थेनें विचार केला. परंतु देशाचें उच्चतम हित, प्रत्यक्ष राज्यपुनर्रचना समितीनेंच मुंबई शहर स्वतंत्र बनविण्याविरुद्ध जे युक्तिवाद केले आहेत ते युक्तिवाद, मराठीभाषी जनतेच्या आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनांत मुंबईला जें स्थान प्राप्त झालें आहे तें स्थान आणि मुंबईची भौगोलिक परिस्थिति – या सर्व गोष्टी लक्षांत घेतां या सर्व कारणांमुळें ती सूचना मान्य होण्यासारखी नाहीं.

"म्हणून म. प्र. कॉं. कमिटीचें कांग्रेसच्या अध्यक्षांना, श्री. नेहरूंना व त्यांच्या सहकाऱ्यांना, त्याचप्रमाणें विदर्भांतील, महागुजरातमधील, मराठवाड्यांतील, मुंबईशहरांतील व इतर महाराष्ट्रांतील लोकांना विनंतिपूर्वक असें आवाहन आहे कीं, महाराष्ट्रीय प्रतिनिधींनीं ज्या वृत्तीनें प्रेरित होऊन आपली सूचना मांडली आहे त्याच वृत्तीनें त्या सूचनेचा स्वीकार करावा.

" या सूचनेचा नीट विचार व्हावा या करितां शांत वातावरण निर्माण करून तें राखावें अशी सर्व मराठीभाषी लोकांना म. प्रां. कॉं. कमिटीची कळकळीची विनंति आहे."








## पुस्तक-परामर्श

**राज्यशास्त्र व शासनसंस्था** : लेखक : **प्रा. व. म. सिरसीकर.** प्रकाशक : **व. वा. जोशी,** वलीभाई बिल्डिंग, रुईकर रोड, नागपूर. २ पानें ६१०. मूल्य ९ रु.

एक काळ असा होता कीं सामान्य माणसाचा शासनसंस्थेशीं क्वचितच् संबंध येई. कायदा व सुव्यवस्था राखणें एवढीच शासनसंस्थेचीं प्रमुख कर्तव्यें मानलीं जात. त्यामुळें अंतर्गत बंडाळी किंवा परचक्राची वावटळ अशा प्रसंगींच शासनसंस्थेची आठवण होई. परंतु औद्योगिक क्रांतीमुळें ज्या नवीन समस्या निर्माण झाल्या, त्यांमुळें शासनसंस्थेस तटस्थ प्रेक्षकाची भूमिका सोडून समाजजीवनाच्या अनेकविध अंगांचें नियत्रण करणें आवश्यक झालें. विशेषतः दोन जागतिक महायुद्धें व १९२९ ची जागतिक आर्थिक मंदी यांमुळें शासनसंस्थेच्या कार्यक्षेत्रामध्यें खूपच वाढ झाली. त्याचप्रमाणें शासनसंस्थेचें स्वरूप व कर्तव्यें यासंबंधींच्या आपल्या कल्पनाहि बदलल्या. आजचें युग तर आर्थिक नियोजनाचेंच आहे. त्यामुळें शासनसंस्थेच्या कार्याचा व्याप दिवसेंदिवस वाढत आहे. राज्याला सर्वंकष व सर्वव्यापी स्वरूप प्राप्त होऊन व्यक्तिस्वातंत्र्य व लोकशाहीचीं मूल्यें यांचा लोप होणार कीं काय अशी साधार भीति कांहीं विचारवंतांना भेडसावूं लागली आहे. अशा वेळीं सामान्य नागरिकाला राज्य, शासनसंस्था व तत्संबंधींचे प्रश्न यांविषयींची प्राथमिक माहिती तरी असणें आवश्यक झाले आहे. त्याचप्रमाणें जागतिक घडामोडींचे प्रतिध्वनी व पडसाद प्रत्येक राष्ट्राच्या जीवनांत उमटत असल्यामुळें लोकशाही, हुकूमशाही, साम्यवाद यांसारख्या विचारप्रणाली व त्यांच्या संघर्षाचें स्वरूप समजावून घेणें हेंहि अगत्याचें झालें आहे.

वरील सर्व दृष्टींनीं प्रा. सिरसीकर यांनीं लिहिलेलें '**राज्यशास्त्र व शासनसंस्था**' हें पुस्तक वाचनीय झालें आहे. अनेक विद्यापीठांच्या पदवीपरीक्षांच्या अभ्यासक्रमांत राज्यशास्त्र हा विषय समाविष्ट आहे. विद्यापीठामध्यें प्रादेशिक भाषांना माध्यम म्हणून मान्यता मिळत आहे. अशा वेळीं राज्यशास्त्रावरील हें सुंदर पुस्तक पदवीपरीक्षेस राज्यशास्त्र हा विषय घेणाऱ्या विद्यार्थ्यांना अतिशय उपयुक्त वाटेल. लेखकाची दृष्टि पाठ्यपुस्तक लिहिण्याची असली तरी सामान्य नागरिकाच्या दृष्टीनेंहि प्रस्तुत पुस्तक वाचनीय झालें आहे. नागरिकाला राज्याचें स्वरूप व त्याची यंत्रणा यांचें सामान्य ज्ञान देण्यासाठीं उपयुक्त ठरतील अशीं राज्यशास्त्रावरील फारच थोडीं पुस्तकें मराठी भाषेंत उपलब्ध आहेत. प्रा. सिरसीकरांच्या पुस्तकानें मराठी भाषेंत राज्यशास्त्रविषयक साहित्याची फार मोलाची भर पडली आहे व त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे.

प्रस्तुत पुस्तकाच्या पहिल्या विभागांत राज्यशास्त्रांतील तात्त्विक प्रश्नांची चर्चा आहे. राज्यशास्त्राचें स्वरूप, त्याच्या अभ्यासाच्या उपयुक्त पद्धती, राज्याच्या स्वरूपाविषयींचे सिद्धान्त, राज्याच्या विकासांतील टप्पे, राज्य, राष्ट्र, शासनसंस्था यांच्यांतील भेद, सार्वभौम सत्तेचें स्वरूप, नागरिकांचे अधिकार व कर्तव्यें, स्वातंत्र्य व समता यांचा अर्थ, त्यांचे अन्योन्यसंबंध, राज्याचें कार्यक्षेत्र, आधुनिक राजकीय विचारप्रणाली इत्यादि महत्त्वाचे विषय '**राज्यशास्त्र**' या विभागांत आले आहेत. एखाद्या विषयाच्या दोन्ही बाजू समतोल वृत्तीनें मांडणें व वाचकाला अनुमानें काढण्याचें स्वातंत्र्य ठेवणें या शास्त्रीय दृष्टीचा ठसा पुस्तकावर उमटलेला आहे. प्रतिपाद्य विषय हाताळतांना प्रसिद्ध राजकीय तत्त्वज्ञांच्या विचारांच्या आधारें विवेचन केलें असल्यामुळें त्यास भरीवपणा आला आहे. विशेषतः 'सामाजिक ईहा', 'सार्वभौम सत्ता', 'आधुनिक विचारप्रणाली' ह्या विषयांवरील विवेचन विशेष वाचनीय झालें आहे. पुस्तकाच्या '**शासनसंस्था**' या दुसऱ्या विभागांत शासनसंस्थांचे प्रकार, अधिकारविभागणीचा सिद्धान्त, लोकमत, विधिमंडळाची रचना व कार्य, कार्यकारी मंडळ, न्यायालय यांची रचना व कार्य, निवडणुकीच्या पद्धती, आंतरराष्ट्रीय संघटना इत्यादि विषयांचें विवेचन आहे. 'राज्यघटना', 'सार्वभौम जनता', 'शासनयंत्रणा' हीं प्रकरणें विशेष वाचनीय आहेत.

पुस्तकाच्या शेवटीं पाठवार वाचनीय ग्रंथांची यादी दिली आहे. त्यामुळें या विषयाचा अधिक अभ्यास करूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांची सोय झाली आहे. पारिभाषिक शब्दांची यादी व राजकीय विचारवंतांची सूचि

दिल्यामुळें वाचकांची सोय झाली आहे.

कांहीं विषयांचें विवेचन अधिक विस्तारपूर्वक केलें असतें तर बरें झालें असतें असें वाटतें. उदाहरणार्थ, सार्वभौम सत्ता व जागतिक शांतता यांच्या परस्पर-संबंधाचें विवेचन फारच त्रोटक वाटतें. त्याचप्रमाणें अराज्यवाद, व्यवसायसंघवाद यांच्या गुणदोषांची चर्चा असती तर चांगलें झालें असतें. विचारप्रणालींच्या केवळ वर्णनामुळें या विषयाच्या अभ्यासकाला त्यांत कांहीं तरी कमी आहे असें वाटतें.

लोकशाहीच्या मूलभूत तात्त्विक सिद्धान्तांचें विवेचनहि अपुरें वाटतें. लोकशाहीची तात्त्विक बैठक व्यक्तीच्या प्रतिष्ठेवर आधारलेली आहे. व्यक्तीची प्रतिष्ठा, व्यक्तीचा विकास हींच अंतिम मल्यें आहेत. व्यक्ति ही बुद्धीवादी असल्यामुळें वादविवाद, मतपरिवर्तन, तडजोड इत्यादि मार्गांनींच समाजाचे प्रश्न सोडविणें शक्य व इष्ट आहे असा लोकशाहीचा विश्वास आहे. हुकूमशाही विचारप्रणाली असा आग्रह धरते कीं, व्यक्तीला स्वहित कळत नाही, बुद्धीपेक्षां उपजत प्रवृत्तीच महत्त्वाच्या आहेत, वादविवाद, विधिमंडळें, तडजोड या सर्व गोष्टी कुच कामी आहेत, व सर्व विवाद्य प्रश्नांचा निर्णय तरवारीच्या साहाय्यानेंच लाविला पाहिजे. म्हणजे व्यक्तीकडे पाहण्याचा दृष्टिकोन व सामाजिक जीवनाचीं नैतिक मूल्यें यांविषयीं लोकशाही व हुकूमशाही यांमध्यें मूलभूत स्वरूपाची मतभिन्नता आहे.

लोकशाहीच्या यशस्वितेस आवश्यक असणाऱ्या मूलभूत गोष्टींचीहि चर्चा अपुरी वाटते. जनतेची जागरूकता, परमतसहिष्णुता इत्यादि गोष्टी आवश्यक आहेतच. परंतु या सर्वांपेक्षांहि जी महत्त्वाची गोष्ट आवश्यक आहे ती म्हणजे मूलभूत स्वरूपाच्या राजकीय, आर्थिक, सामाजिक प्रश्नांसंबंधी जनतेमध्यें तात्त्विक स्वरूपाचें कां होईना मतैक्य पाहिजे. तरच व्यवहाराच्या पातळीवर देवाणघेवाण होऊन तडजोड शक्य होईल. ज्याला Community of civilisation किंवा 'सांस्कृतिक एकता' म्हणतात ती जनतेमध्यें पाहिजे. लोकशाही मतभिन्नतेचें स्वागत करते. परंतु ती मतभिन्नता मूलभूत स्वरूपाची असतां उपयोगी नाहीं. जेथं मूलभूत प्रश्नावर तात्त्विक मतैक्य आहे तेथेंच तडजोड, देवाणघेवाण होऊं शकेल. सहिष्णुताहि फारशी ताणली जाणार नाहीं. एकाच ध्येयाकडे, एकाच दिशेनें जावयाचें यावर सर्व पक्षांचें मतैक्य असेल तर किती वेगानें वाटचाल करावयाची या प्रश्नाचा निर्णय, तडजोड, वादविवाद इत्यादि मार्गांनीं होऊं शकेल. परंतु लोकशाही कीं हुकूमशाही, भांडवलशाही कीं साम्यवाद यांसारख्यां मूलभूत प्रश्नासंबंधींच मतभेद असतील तर लोकशाही राज्यव्यवस्थेची यंत्रणा सुरळीतपणें चालूं शकणार नाहीं. पहिल्या महायुद्धानंतर अनेक युरोपीय राष्ट्रांत लोकशाही घटना गडगडल्या याचें कारण तेथील पक्षोपपक्षांत मूलभूत प्रश्नावर सर्वसाधारण स्वरूपाचेंदेखील मतैक्य नव्हतें. त्यामुळें विधिमंडळामध्यें पुष्कळदां शाब्दिक युक्तिवादांऐवजीं शारीरिक दंडेलीचेहि प्रकार होत.

लोकशाहीचें भवितव्य शैक्षणिक प्रगतीप्रमाणेंच आर्थिक स्थैर्य व जागतिक शांतता यांवर प्रामुख्यानें अवलंबून आहे. १९२९ च्या जागतिक मंदीमुळें हिट्‌लरचा उदय झाला या म्हणण्यांत पुष्कळसें तथ्य आहे. त्या मंदीची पुनरावृत्ति झाली तर लोकशाही राज्यव्यवस्था टिकवून धरणें कठीण होईल. अस्थिर व असुरक्षित आर्थिक जीवनांत स्थैर्य निर्माण करण्याकरितां शासनसंस्थेस आपलें कार्यक्षेत्र वाढवावें लागेल. त्यामुळें शासनसंस्थेच्या अधिकाराची व्याप्ति वाढेल व त्या प्रमाणांत व्यक्तिस्वातंत्र्याचा संकोच होऊन सर्वंकष राज्य निर्माण होण्याचा धोका वाढेल. महायुद्धामुळेंहि लोकशाहीचें भवितव्य धोक्यांत येईल. कारण महायुद्धामध्यें पहिला बळी व्यक्तिस्वातंत्र्याचा पडतो. अनेक प्रकारचीं नियंत्रणें येतात. जीवनाला साचेबंदपणा येऊं लागतो.

प्रो. डायसींच्या मतें राज्यघटनेंत मूलभूत अधिकार समाविष्ट करणें आवश्यक कां आहे याचेंहि विवेचन प्रस्तुत पुस्तकांत असतें तर चांगलें झालें असतें. मूलभूत अधिकार घटनेंत समाविष्ट केल्यामुळें ते प्रतिदत्त आहेत, स्वयंभू नाहींत असा समज निर्माण होण्याची शक्यता असते. मूलभूत अधिकार जन्मसिद्धच आहेत. म्हणून ते घटनेंत समाविष्ट करण्याची जरूरी नाहीं, असें प्रो. डायसी यांचें म्हणणें आहे. अर्थात् हें म्हणणें ग्राह्य आहे असें नव्हे. परंतु प्रो. डायसी यांचा दृष्टिकोन समजण्यास त्यांनीं दिलेल्या कारणांचा उल्लेख आवश्यक वाटतो.

प्रस्तुत पुस्तकांतील कांहीं विधानें मात्र बरोबर








वाटत नाहींत. उदाहरणार्थ, "साम्यवादी समाजांत सत्ता एकाच पक्षाच्या हातीं असली तरी प्रत्येक नागरिक हा सर्व राजकीय प्रश्नांबाबत स्वतःचीं मतें बनवूं शकतो व प्रकट करूं शकतो." साम्यवादामुळें जीवनातलें वैचित्र्य नष्ट होऊन तें साचेबंद होतें या लेखकाच्या विचाराशीं वरील विधान विसंगत तर वाटतेंच. परंतु तें बरोबरहि नाहीं. साम्यवादी समाजांत वैचारिक क्षेत्रांत देखील साचेबंदपणा कसा येतो हें रशियामध्यें घडलेल्या अलीकडील कांहीं घटनांवरून समजण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें "विचारप्रणालीचा आधार बुद्धि व श्रद्धा असा दुहेरी असतो" हें विधानहि अतिव्याप्तीच्या दोषास पात्र आहे. कांहीं विचारप्रणालींचा आधार दुहेरी असूं शकेल. परंतु सर्व विचारप्रणालींच्या बाबतींत असें विधान करणें योग्य होणार नाहीं. फॅसिस्ट विचारसरणी तर बुद्धिवादाचा उघडउघड अधिक्षेप करते. श्रद्धा हाच त्या विचारसरणीचा मुख्य आधार आहे. १९२९ मध्यें "व्यापार किमान मर्यादेपर्यंत घटला" असें एक विधान पुस्तकांत आहे. यामध्यें 'किमान मर्यादा' हा शब्दप्रयोग बरोबर नाहीं. व्यापार घटण्याची किमान मर्यादा ठरलेली नाहीं. अर्थात् व्यापार पूर्णपणें बंद पडणें ही किमान मर्यादा आहे. परंतु ती मर्यादा कांहीं त्या वेळीं गांठली गेली नव्हती. तसेंच "समाजातील धनिक-वर्गास बंधनाचा अभाव हेंच स्वातंत्र्य वाटतें" हें विधानहि पूर्णतः बरोबर नाहीं. धनिकवर्गास मालमत्तेवरचें नियंत्रण नको असतें. मालमत्तेस संरक्षण देणारीं बंधनें त्यांना हवीं असतात.

एकदोन ठिकाणीं कालक्रमाचीहि अनवधानानें उलटापालट झाली आहे. उदाहरणार्थ "हर्बर्ट स्पेन्सरनें प्राणी आणि समाज यांची तुलना करून व्यक्तिस्वातंत्र्याचा एकांतिक पुरस्कार केला आहे. त्याच्याच युक्तिवादाचा अवलंब करून जर्मन तत्त्वज्ञ हेगेलप्रभृतींनीं राज्याचें सर्वाधिकारित्व प्रतिपादन केलें आहे," हें विधान पहा. हेगेलच्या मृत्यूच्या वेळीं स्पेन्सर फक्त ११ वर्षांचा होता. तेव्हां हेगेलनें स्पेन्सरच्या युक्तिवादाचा आश्रय केला हें म्हणणें योग्य नाहीं. त्याचप्रमाणें ॲडॅम स्मिथ्च्या अनिर्बंध स्पर्धेच्या व आर्थिक स्वातंत्र्याच्या तत्त्वास फिजिओक्रॅटस्नीं पुष्टि दिली हें म्हणणेंहि योग्य नाहीं. कारण फिजिओक्रॅटस्च्या केने या प्रमुख विचारवंताच्या मृत्यूनंतर दोन वर्षांनीं ॲडॅम स्मिथ्चा 'Wealth of Nations' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. ॲडॅम स्मिथ्पूर्वींच फिजिओक्रॅटिक विचारवंतांनीं आर्थिक नियंत्रणावर हल्ला चढविला व आर्थिक स्वातंत्र्याच्या कल्पनेचा पुरस्कार केला. ॲडॅम स्मिथनें त्या कल्पनेस तात्त्विक सिद्धान्ताचें अधिष्ठान दिलें.

कांहीं ठिकाणीं शब्दप्रयोग खटकल्यासारखे व चमत्कारिक वाटतात. 'सत्तेच्या अमानुष हव्यासामुळें' यामध्यें अमानुष ऐवजीं अमर्याद हा शब्द योग्य होईल. 'मानसिक निष्फलता' असा वाक्प्रचार नाहीं. मानसिक वैफल्य किंवा विफलता हाच शब्दप्रयोग बरोबर आहे. चौवार्षिकपेक्षां चतुर्वार्षिक असा शब्दप्रयोग पाहिजे. 'राष्ट्रसंघाच्या असफलतेचीं कारणें' यापेक्षां 'अयशस्वितेचीं कारणें' हा शब्दप्रयोग योग्य होईल. चारदोन ठिकाणीं मुद्रणदोषहि राहून गेले आहेत. उदाहरणार्थ, भागोलिक एकता, उत्पानवाढ, कार्यश्रेत्र, एकोणिकाव्या, वक्तृत्वसंपन्न, वगैरे. 'हॉब्ज्ला राज्यसत्ताच मनापासून हवी होती' या वाक्यांत 'राजसत्ताच' असें पाहिजे.

प्राध्यापकांना परिभाषेविषयीं अभिनिवेश नाहीं हें त्यांनींच प्रस्तावनेंत सांगून टाकल्यामुळें त्याविषयीं कांहीं लिहिण्यासारखें नाहीं. परंतु प्रसंविदा या अवघड शब्दाऐवजीं करार हा शब्दच बरा वाटतो. 'Electoral college' याला 'मतदारसमूह' हा प्रतिशब्द 'निवडणूकसमूह' या शब्दापेक्षां बरा वाटतो. 'प्रसंविदा हा एक करार आहे' हें वाक्यहि चमत्कारिक वाटतें. सामाजिक ईहा, गाठ्रक, विधिमय इत्यादि शब्द भाषेंत चपखल बसण्यासारखे आहेत.

वरीलसारखे कांहीं किरकोळ दोष वगळल्यास पुस्तक फारच चांगलें आहे. पुस्तकाची भाषा प्रवाही, अर्थवाहक व सुबोध आहे. तात्त्विक विषयांची रूक्षता व क्लिष्टता टाळून सुलभ विवेचन करणें ही एक कला आहे. ती प्रा. सिरसीकरांना चांगलीच अवगत आहे. पुस्तकाची छपाईहि सुंदर व स्वच्छ आहे. ६०० पानाच्या या ग्रंथानें शास्त्रीय व विवेचक स्वरूपाच्या मराठी साहित्यांत फार मोलाची भर पडली आहे.

— न. क. कुलकर्णी






# आंतरराष्ट्रीय राजकारण

# सारसंकलन

## सोविएट – प० जर्मनी करार

सप्टेंबर महिन्यांत पश्चिम जर्मनीचे चॅन्सेलर ॲडेनॉव्हर यांच्या नेतृत्वाखालीं एक सरकारी शिष्टमंडळ मॉस्को येथें गेलें. सोविएट सरकारशीं त्यांचीं बोलणीं होऊन उभयराष्ट्रांत एकमेकांकडे वकिलाती सुरूं करण्याचा आणि व्यापारी व सांस्कृतिक देवाणघेवाण सुरूं करण्याचा करार झाला. या प्रसंगीं दोन्ही राष्ट्रांतील प्रतिनिधींची चर्चा, करार, त्यानंतरच्या घटना आणि करारासंबंधींच्या महत्त्वाच्या प्रतिक्रिया यासंबंधीं महत्वाची माहिती खालीलप्रमाणें देतां येईल

ता. ९ सप्टेंबर १९५५ रोजीं सुरूं झालेल्या चर्चेतील मा. बुल्गॅनिन यांच्या प्रास्ताविक भाषणांतील कांहीं महत्त्वाचा भाग असा :

" आज सुरूं होत असलेलीं बोलणीं होण्यापूर्वी सोविएट सरकार आणि प० जर्मनीचें संयुक्त प्रजासत्ताक सरकार यांनीं एकमेकांना खलिते धाडले होते. आणि आपल्या या दोन्ही राष्ट्रांमध्यें वकिलातीचे, व्यापारी व सांस्कृतिक संबंध सुरूं करण्यांत यावेत यासंबंधीं चर्चा व्हावी असें सोविएट सरकारनें प० जर्मनी सरकारला सुचविलें होतें हें आपणांस माहीत आहेच. दोन्ही राष्ट्रांत अशा प्रकारचे सर्वसाधारण संबंध प्रस्थापित होणें हें उभयतांच्या हिताच्या दृष्टीनें इष्ट आहे, हें सोविएट सरकारचें या बाबतचें गृहीत कृत्य आहे.

" जर्मनीचें एकीकरण पुनः प्रस्थापित करण्याच्या दृष्टीनें या ठिकाणीं विचारविनिमय करण्याची तयारी सोविएट सरकारनें व्यक्त केली असल्याचेंहि आपणांस माहीत आहे. तथापि, त्याबरोबरच प० जर्मनीनें लष्करी गटांत सामील होण्याचा आणि आपलें लष्करी संघटन उभारण्याचा पॅरिस कराराला मान्यता देऊन निर्णय घेतला असल्यामुळें या बाबतींत एक मोठीच अडचण निर्माण झाली आहे. याशिवाय, आणखी एक मुद्दा ध्यानांत घेतला पाहिजे : जर्मनीचें एकीकरण हा प्रामुख्यानें जर्मन जनतेचाच प्रश्न आहे हें सोविएट सरकारनें नेहमींच मान्य केलें आहे. त्यासाठीं प० जर्मनी आणि पूर्व जर्मनीमध्यें प्रत्यक्ष प्रस्थापित झालेली परिस्थिति ध्यानांत घेतली पाहिजे. आणि त्याबरोबरच यूरोपांतील शांतता व सुरक्षितता कायम राखण्याच्या हेतूनें झालेले आंतरराष्ट्रीय करारहि या बाबतींत विचारांत घेतले पाहिजेत. शांतताप्रिय आणि लोकशाही राज्य म्हणून जर्मनीचें एकीकरण होण्याला सोविएट सरकारचा नेहमीच पाठिंबा होता व राहीलहि. "

१० सप्टेंबर १९५५ रोजींच्या क्रुश्चेव्हच्या भाषणांतील महत्त्वाचा भाग असा आहे :

" प० जर्मनीचे चॅन्सेलर ॲडेनॉव्हर आणि परराष्ट्रमंत्री ब्रेटानो यांनीं केलेल्या विधानासंबंधीं मला कांहीं सांगावयाचें आहे. जर्मनींत शिरल्यानंतर सोविएट सैन्यानें क्रूरपणाचें वर्तन केलें असें त्यांचें म्हणणें आहे. आम्हांला हें विधान सर्वस्वीं अमान्य आहे. आक्रमकांना आपल्या प्रदेशांतून सोविएट सैन्यानें बाहेर घालविलें आणि ते शस्त्रत्याग करीनात म्हणून त्यांचा पाठलाग केला. असा पाठलाग केला नसता तर त्यांनीं पुनः स्थिरस्थावर होऊन चढाई केली असती ... हें क्रौर्य म्हणतां येईल काय ? जर्मनीवर कोणी चढाई केली आणि जर्मन सेना देशाचें संरक्षण करीत करीत शत्रूवर आक्रमण करून गेली तर त्याला क्रौर्य म्हटलें जाईल काय ? हें जनतेचें एक पवित्र कर्तव्यच म्हटलें पाहिजे. म्हणूनच वरील विधान सोविएट सेनेचा अपमान करणारें आलें आहे असें मी म्हणतों.

" चॅन्सेलर आणि परराष्ट्रमंत्री यांनीं आपल्या भाषणांत अनेक कुटुंबांना आपलीं माणसें कोठें आहेत यासंबंधीं कांहींच माहिती नसल्याचा उल्लेख केला. या कुटुंबीयांच्या – पिता, पुत्र, माता, पत्नी इत्यादिकांच्या भावना आम्हाला समजूं शकतात. तथापि त्यांना खरा गुन्हेगार दाखविण्याचें धैर्य आपण बाळगलें पाहिजे. अनेक कुटुंबांतील माणसें नष्ट झालीं हा दोष कुणाचा ? या सर्व आपत्ती हिटलर आणि त्याची टोळी यांच्यामुळेंच उद्भवल्या आहेत ! "

१० सप्टेंबर १९५५ च्या मोलोटॉव्ह यांच्या भाषणांतून पुढील भाग घेतला आहे :

" जर्मन जनता आणि हिट्लर व नाझीवाद हीं एकच नव्हत असें प० जर्मनीचे चॅन्सेलर म्हणतात. आम्हाला हें पूर्ण मान्य आहे. १९४२ सालीं जे. व्ही. स्टालिन यांनीं उच्चारलेले शब्द आमच्या पूर्ण स्मरणांत








आहेत. स्टालिन म्हणाले कीं असे हिट्लर अनेक येतील व जातील; पण जर्मन जनता व जर्मन राज्य हीं कायम रहाणार आहेत. सर्व सोविएट जनतेच्या मनांत खोलवर रुजलेले विचार या शब्दांत व्यक्त झालेले आहेत.

तथापि हिट्लरच्या सैन्यानें सोविएट युनियन-वर हल्ला केला नसता तर जर्मन जनतेलाहि हाल सहन करावे लागले नसते हें खरें नाहीं काय ? हिट्लर व नाझीवाद यापासून मुक्त होण्याचें सामर्थ्य जर्मन जनता दाखवूं शकली नाहीं हें सिद्ध झालेलें नाहीं काय ? दुसरें महायुद्ध सुरू होण्यापूर्वीच हिट्लर व नाझीवाद यांना जर्मन जनता नेस्तनाबूत करूं शकली असती तर सोविएट जनतेला इतर कोणाहिपेक्षां अधिक आनंद झाला असता. परंतु जर्मन जनता त्यावेळीं हें करूं शकली नाहीं.

जर्मन शिष्टमंडळाच्या नेत्यांनीं युद्धकैदी आणि जर्मनीचें एकीकरण असे दोन प्रश्न उपस्थित केले आहेत. युद्धकैद्यांचा प्रश्न म्हणजे युद्धकाळांत अत्यंत हीन स्वरूपाचे गुन्हे केल्याबद्दल सोविएट कोर्टांनीं गुन्हेगार म्हणून शिक्षा सुनावलेल्या विशिष्ट कैद्यांच्या गटाचा प्रश्न होय. आपल्या कालच्या भाषणांत ' युद्धकैदी ' हा शब्दप्रयोग वापरला नव्हता असें चॅन्सेलरनीं आज विधान केलें आहे, हें खरें आहे. ' युद्ध गुन्हेगार ' हाहि शब्द-प्रयोग त्यांत नव्हता हेहि खरें आहे. तर मग आपण कोणासंबंधीं बोलत आहोंत ? जर्मन शिष्टमंडळानें उपस्थित केलेल्या प्रश्नांत कोण अभिप्रेत आहेत ? अत्यंत क्रूर स्वरूपाचे, सोविएट जनतेविरुद्ध शांतता व मानवता यांना काळिमा फासणारे गुन्हे केलेले काहीं हजार कैदी आमच्याकडे आहेत. आणि सोविएट सरकारपुढें टाकण्यांत येणाऱ्या या प्रश्नांत तेच अभिप्रेत आहेत "

ता. १३ सप्टेंबर १९५५ रोजीं उभयराष्ट्रांनीं परस्पराकडे वकिलाती उघडण्याचा निर्णय घेतला असल्याचें व तो निर्णय उभय राष्ट्रांतील कायदेमंडळापुढें मान्यतेसाठीं ठेवण्यांत येणार असल्याचें संयुक्त निवेदन काढण्यांत आलें.

मा. बुल्गानिन यांच्या १५ सप्टेंबर १९५५ या निवेदनांतून पुढील भाग घेतला आहे :

" गेल्या महायुद्धांत हिट्लरच्या सैन्यानें तात्पुरत्या जिंकलेल्या सोव्हिएट प्रदेशांतून लक्षावधी सामान्य सोव्हिएट नागरिकांना बळजबरीनें जर्मनींत नेण्यांत आलें. जबरदस्तीनें भरती केलेल्या कामगारांच्या कॅम्पसमध्यें त्यांतील हजारों सोव्हिएट स्त्रीपुरुष मरण पावले. हिट्लरच्या सैन्याचा पराभव झाल्यानंतर जर्मनींत जिवंत असलेल्या सोव्हिएट नागरिकांपैकीं बहुसंख्य नागरिक परत आले. तथापि अनेकांना, विशेषतः पश्चिम जर्मनींत, मागें डांबून ठेवण्यांत आलें.

' आमच्या माहितीप्रमाणें अशा प्रकारचे निदान एक लक्ष तरी नागरिक अजून संपूर्ण निराधार अवस्थेंत पश्चिम जर्मनींत आहेत. घरदार वा स्वदेश यांपासून दूर असलेल्या या दुर्दैवी स्त्रीपुरुषांपैकीं बहुसंख्य लोकांना कायमचा कामधंदा नाहीं, चरितार्थाचें साधन नाहीं; त्यांना दारिद्र्य व अन्य हाल-अपेष्टा सहन कराव्या लागत आहेत. ते परकीयांच्या ताब्यांत असल्यामुळें त्यांना कोणतेहि हक्क नाहींत; उलट, सर्वस्वी परावलंबी अवस्थेंत त्यांना जगावें लागत आहे. असंतुष्ट असलेल्या कित्येक सोव्हिएट निर्वासितांना प० जर्मनींत तुरुंगांत डांबून ठेवलें असल्याचें वृत्तहि आमच्या कानीं आलें आहे.

" या निर्वासितांच्या बाबतींत प० जर्मनींत निर्माण झालेली परिस्थिति अत्यंत चमत्कारिक स्वरूपाची आहे. मानवता आणि व्यक्तिस्वातंत्र्य यांना ती सर्वस्वीं विरोधी आहे. विशिष्ट परिस्थितींत आपल्या मातृभूमीशीं विरोधी स्वरूपाचें वर्तन करणाऱ्या नागरिकांचें देखील रक्षण करणें सोव्हिएट सरकाराला आपलें पवित्र कर्तव्य वाटतें."

डेली हेरल्डचे डिप्लोमॅटिक वार्ताहर डब्ल्यू. एन्. युवेर यांच्या लेखांतून पुढील भाग घेतला आहे :

" बड्या चौघांच्या परराष्ट्रमंत्र्यांची जिनेव्हा येथील बैठक सुरू होण्यास एक महिन्याचा अवधि शिल्लक राहिला आहे; आणि सोविएट युनियनचें जर्मन एकीकरणासंबंधींचें धोरण अधिक स्पष्ट व निश्चित स्वरूप घेऊं लागलें आहे. कोमिन्फॉर्मच्या पत्रिकेंत म्हटल्याप्रमाणें ' जर्मन एकीकरणाचा प्रश्न जर्मन जनतेनेंच सोडविला पाहिजे ' हें त्या धोरणाचें सूत्र होय.

" वरवर पहातां या विधानांत समजूतदारपणाची दृष्टि आढळते. परंतु त्याचा अर्थ स्पष्ट आहे. सर्व जर्मनींत खुल्या निवडणुका होऊन त्या आधारावर

एकीकरण घडून यावें या कल्पनेऐवजीं पश्चिम व पूर्व जर्मनींतील प्रस्थापित राज्यें एकत्र येऊन जर्मनी एक व्हावा अशी ही कल्पना आहे. हिच्या मुळाशीं असलेली मागणी नवीन आहे. जर्मन एकीकरणाच्या प्रश्नाचा परराष्ट्र मंत्र्यांच्या परिषदेंत विचार होत असतांना पश्चिम व पूर्व जर्मन अशा दोन्ही राज्यांच्या प्रतिनिधींना त्यांत भाग घेण्यास बोलवावें, अशी ही मागणी आहे. म्हणजे पूर्व जर्मन सरकारला प. जर्मनी आणि पाश्चात्त्य राष्ट्रें यांनीं मान्यता द्यावी असा तिचा अर्थ आहे. अशी मान्यता देणें असमर्थनीय आहे. म्हणून पाश्चात्त्य राष्ट्रांनीं न्यूयॉर्कमधील नुकत्याच झालेल्या त्यांच्या बैठकीनंतर ही मागणी पुनः नाकारली आहे. ”

पूर्व जर्मन सैन्य अस्तित्वांत आणण्यासाठीं तेथील पार्लमेंटमध्यें नुकत्याच ( चर्चेवांचून ) पास झालेल्या कायद्याचा उल्लेख करून **युचेर** पुढें लिहितो :

“ हें कायदेशीरपणें अस्तित्वांत येत असलेलें सैन्य वस्तुतः ‘ जनता–पोलिस ’ या स्वरूपांत गेलीं सात वर्षें अस्तित्वांत आहे. सैन्याच्या या छद्मी स्वरूपामुळें या बाबतींत आजवर कोणाचीहि दिशाभूल झालेली नाहीं. हें सैन्यबल सांप्रत एक लक्षाइतकें आहे. एकूण सात डिव्हिजन्सपैकीं तीन डिव्हिजन्स यांत्रिक शस्त्रसामग्रींनीं सुसज्ज आहेत. मध्यम व मोठया मिळून २००० तोफा, १५०० टँक्स व लष्करी गाडया आणि छोटीं वैमानिक व नौकादलें त्याजपाशीं आहेत. या सैन्यांतील बरेच लहानमोठे अधिकारी पूर्वीच्या ‘ हिट्लरी ’ सैन्यांतील अधिकारी होत. उदाहरणार्थ, दक्षिण फौजेचा प्रमुख मेजर जनरल हर्मन रेंन्श हा आहे. पूर्वी हिटलरच्या सातव्या पलटणीचा प्रमुख असलेला ले. ज. व्हिन्सेंज म्यूलर हा मुख्य लष्कराचा प्रमुख आहे.

“ आतां कायदेशीर स्वरूप देण्यांत आलेल्या पूर्व जर्मनींतील लष्कराची ही परिस्थिति आहे. पश्चिम जर्मनीचें काय ? पश्चिम जर्मनींत जणुं कांहीं लष्करी संघटना उभारलीच गेली आहे आणि म्हणून पूर्वजर्मनींत नाईलाजानें हें करावें लागत आहे, असा कम्युनिस्ट प्रचार आहे. पण तो वस्तुस्थितीशीं पूर्णतया विसंगत आहे.

“ प० जर्मनींत सैन्य मुळीं अस्तित्वांतच नाहीं. कोणत्याहि प्रकारचें परिणामकारक लष्कर तेथें नाहीं. कांहीं हजारांच्या संख्येनें राज्याचे व सरहद्दीवरील, ‘पोलिस’ तेथें आहेत. आणि बंदुकी व साध्या मशिनगन्स ही एवढीच त्यांच्याजवळची सामग्री होय. त्यांना लष्करी शिक्षण देण्यांत आलेलें नाहीं. तोफा, रणगाडे, लष्करी गाड्या इत्यादि त्यांच्याजवळ कांहींहि नाहीं. ते ‘ पोलिस ’ होत, सैन्य नव्हे.

“ नाटोच्या संरक्षणदलाचा भाग म्हणून प० जर्मनींत सैन्य उभारण्याचा निर्णय घेण्यांत आला आहे हें खरें आहे. तथापि अजून तो केवळ कागदोंपत्रींच आहे. पश्चिम जर्मनींत एकहि सैनिक अजून गणवेशांत नाहीं. भरतीचें कामच मुळीं १ जानेवारीपासून सुरु व्हावयाचें आहे. आणि भरतीनंतर आर्मींच्या रिक्रूटांना लष्करी शिक्षण द्यावें लागेल. त्यानंतर ते मुख्य सैन्याची उभारणी व तयारी करूं शकतील. पश्चिम जर्मनींतील नाटोच्या लष्कराचा १२ डिव्हिजन्सचा संकल्पित भाग प्रत्यक्ष अस्तित्वांत येण्यास १९५८ सालच्या अखेरपर्यंत किमान कालावधि लागेल. अशा प्रकारें लष्करीकरणाचें कार्य पूर्व जर्मनींत निदान सात वर्षें तरी आधीं सुरूं झाल्याचें दिसतें.

“जिनेव्हा येथें मोलोटॉव्हकडून निश्चितपणें अपेक्षित असलेल्या जर्मन एकीकरण-योजनेचा विचार करतांना वरील अत्यंत महत्त्वाचा घटक दृष्टीआड होतां कामा नये. सोविएट व पूर्वजर्मन वृत्तपत्रावरून आणि कम्युनिस्ट नेत्यांच्या भाषणावरून ही योजना पुढीलप्रमाणें असावी असें म्हणतां येईल : दोन्ही जर्मन सरकारांनीं एकत्र येण्याच्या हेतूनें बोलणीं करावीत. या बोलण्यांचा परिणाम म्हणून संयुक्त जर्मन सरकार अस्तित्वांत यावें. कम्युनिस्टांना या सरकारमध्यें प. जर्मनीच्या बरोबरीनें सत्ता व अधिकारस्थानें मिळावींत. सर्व दोस्त राष्ट्रांचें सैन्य जर्मनींतून काढून घेण्यांत यावें. या योगानें एक लक्ष कम्युनिस्ट सैन्याव्यतिरिक्त त्या देशांत सैन्यच शिल्लक रहाणार नाहीं.

“ हें कम्युनिस्ट सैन्य देखील तत्त्वतः कमी केलें जाईल यांत शंका नाहीं. मोलोटॉव्हनें तशी सूचनाहि केली आहे. तथापि या बाबतींत निश्चित हमी दिली जाणार नाहीं. लष्करी शिक्षण घेतलेलीं माणसें आणि अधिकारी तत्त्वतः नसले तरी प्रत्यक्षांत शिल्लक रहाणारच. कांहीं थोड्या दिवसांच्या अवधींतच यांतून कम्युनिस्ट लष्करी संघटना उभारली जाणें शक्य आहे.








आणि तिच्यावर सरकारचें नियंत्रण असणार नाहीं. अशा प्रकारच्या 'स्वयंसेवक' संघटनांनीं वायमारची लोकशाही जवळजवळ संपुष्टांत आणल्याचें आणि हिट्लरचा मार्ग सुकर केल्याचें सर्वांच्या स्मरणांत आहेच."

मॉस्को करारासंबंधीं 'संडे टाइम्स्' १८ सप्टेंबर १९५५ च्या अंकांत लिहितो :

"वकिलाती उघडण्याच्या डॉ. ॲडेनॉव्हर यांचा मार्शल बुल्गानिनबरोबर झालेला करार हें एका अर्थी पूर्व-पश्चिमसंबंध सुधारण्याच्या मार्गांतील एक स्वाभाविक व उपयुक्त स्वरूपाचें पाऊल होय. जुलैंतील जिनेव्हापरिषदेमुळें निर्माण झालेल्या चांगल्या वातावरणाचें तें एक पहिलें फळ होय. पश्चिम जर्मनीचें सार्वभौमत्व व संभाव्य सामर्थ्य यांकडे इतःपर दुर्लक्ष करतां येणार नाहीं किंवा त्याचा अवमानहि करतां येणार नाहीं हें या मान्यतेच्या योगानें सोविएट युनियननें स्पष्ट केलें आहे.

"तथापि दुसऱ्या दृष्टीनें सुमारें ९००० जर्मन कैद्यांच्या भवितव्याचा रशियानें राजकीय वाटाघाटींत एक हुकमी मुद्दा म्हणून उपयोग केला आहे. भूतदया व राजकारण या दोन्ही दृष्टींनी प० जर्मनीच्या चॅन्सेलरला ही संधी दवडणें अशक्य झालें. यामुळें पाश्चात्त्य राष्ट्रांच्या मानानें रशियाला अधिक मोक्याचें स्थान मिळवतां आलें. बड्या राष्ट्रांमध्यें दोन्ही जर्मनींशीं संबंध असलेलें रशिया हें एकच राष्ट्र होय. आणि या स्थानावरून प० जर्मनीचें पूर्व जर्मनीशीं बरोबरीच्या नात्यानें बोलणीं करण्यासाठीं मन वळविण्याचा प्रयत्न करणें रशियाला शक्य होईल. युद्धोत्तर काळांतील पोलंडमधील लुब्लिन समिति हा या बाबतींत महत्त्वाचा दाखला म्हणून ध्यानांत घेतला पाहिजे.

"जर्मनीला अनिश्चित काळपर्यंत विभागलेल्या अवस्थेंत ठेवणें अशक्य आहे याची रशिया आणि पाश्चात्त्य राष्ट्रें या दोहोंनाहि जाणीव आहे. खुल्या मार्गानें एकीकरण घडवून आणावयाचें म्हटल्यास रशियाचें एक अंकित राष्ट्र लोकशाहीकडे झुकेल अशी पाश्चात्त्य राष्ट्रांना आशा आणि रशियाला भीति वाटते. म्हणून रशिया पूर्वजर्मनींतील कम्युनिस्ट राजवटीला समान दर्जा मिळविण्याच्या मागणीचा सातत्यानें पाठपुरावा करीत आहे. त्याचबरोबर १९५४ च्या बर्लिन परिषदेपासून खुल्या सार्वत्रिक निवडणुकींच्या आधारें एकीकरण घडवून आणण्याला सतत विरोध करीत आहे. हा लोकशाही मार्ग टाळतां यावा किंवा पुढें ढकलला जावा यासाठींच नाटो आणि वॉर्सा करारांऐवजीं नव्या युरोपीय सुरक्षिततेच्या कराराची मागणी करण्यांत येत आहे.—"

## पोरकला तळ परत करण्याचा निर्णय

पोरकला नाविक तळ फिनलंड्ला परत करण्याच्या घोषणेचा उल्लेख करून, **डेली टेलीग्राफ, १९ सप्टेंबर, १९५५** या वृत्तपत्रानें लिहिलें आहे :

"अणुयुगांतील युद्धगरजांची जाणीव रशियाला हळुहळु होत असल्याचा नवा पुरावा अलीकडे दर महिन्याला मिळूं लागला आहे."

"फिन्लंडच्या भूमीवरील हा तळ कायम ठेवून लेनिन्ग्राडच्या संरक्षणाच्या दृष्टीनें होणाऱ्या लष्करी फायद्याच्या मानानें, तो परत केल्यानें होणारा राजकीय व प्रचारात्मक फायदा कितीतरी अधिक आहे. गेल्या वर्षीं चीनला पोर्ट आर्थर परत करण्याच्या, ऑस्ट्रियांतून सैन्य काढून घेण्याच्या व सैन्यबळ पांचसहा लाखांनीं कमी करण्याच्या निर्णयांनाहि हें विधान लागूं होण्यासारखें आहे.

"फिन्लंडमधील अपेक्षित परिणाम व इतरत्र व्यापक प्रमाणांत होणाऱ्या प्रतिक्रिया या दोन्ही दृष्टींनीं पोरकलाबाबतचा निर्णय हा एक चलाखीचा निर्णय वाटतो. स्कॅंडिनेवियांतील लोकमतावर परिणाम घडवून आणणें हा त्यांतील मुख्य हेतु असावा. नॉर्वे व डेन्मार्क यांचा नाटोविषयींचा उत्साह कमी करणें आणि स्वीडन्ला पाश्चात्त्य गटाबाहेर रहाणेंच योग्य होय अशी त्याची खात्री पटविणें हा तो हेतु होय.

"स्कॅंडिनेव्हियाबाहेर अमेरिकेनें युरोपांतील आपले लष्करी तळ हलविले पाहिजेत या रशियाच्या मागणीला पुष्टि देण्याचाहि हेतु त्यांत आहे. रशिया आपले लष्करी तळ काढून घेत आहे असें पाहून भोळसट लोकांना अमेरिकेनेंहि तसेंच करावें असें वाटणें स्वाभाविक आहे. तथापि आपल्या महत्त्वाच्या हितसंबंधांना कसलाहि बाध न आणतां रशिया हें करूं शकतो. अमेरिकेला मात्र जागतिक परिस्थितींतील सत्तेचा समतोलपणा व जागतिक शांतता धोक्यांत आणल्यावांचून तसें करणें अशक्य आहे. भौगोलिक










वस्तुस्थिति ध्यानांत घेतल्यास रशिया व अमेरिका यांच्यांत या बाबतींत तुलना करूं पहाणें दुटप्पीपणाचें होय हें चटकन् ध्यानांत येईल. "

## अरब राष्ट्रांना रशियाची लष्करी मदत

रशियानें जें इजिप्तला लष्करी आणि आर्थिक साहाय्य देऊं केलें आहे आणि अन्य अरब राष्ट्रांच्या बाबतींत देखील अशाच प्रकारची मोघम घोषणा केली आहे त्याबद्दल 'टाईम्स' (लंडन) १२-१०-५५ या वृत्तपत्रानें लिहिलें आहे :

या बातमीनें पाश्चात्त्य राष्ट्रांना अलीकडच्या काळांतील सर्वांत मोठा हादरा बसला आहे. पाश्चात्त्य राष्ट्रें हींच आजवर मध्यपूर्वेकडील प्रदेशांत सर्वस्वीं मार्गदर्शन करीत. आतां तांतडीनें परिस्थितीचा पुनः आढावा घेण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. रशिया आतां दाराशींच उभा आहे.

"आजवर, एक तर पाश्चात्त्य राष्ट्रांशीं सहकार्य किंवा कोणाचाहि पाठिंबा नसलेली दुबळी तटस्थता हे दोनच मार्ग अरब राष्ट्रांपुढें होते. रशियानें आतां तिसरा मार्ग सुचविला आहे. कम्युनिस्ट अथवा पूर्व व पश्चिम अशा दोहोंच्याहि साहाय्यावर आधारलेली तटस्थता हा तो मार्ग होय.

" या अत्यंत नाजूक परिस्थिति असलेल्या भागांत बड्या राष्ट्राची चुरस सुरूं होणें अत्यंत धोक्याचें आहे. तथापि हा धोका दाखवितांच किंवा लष्करी स्वरूपाची चुरस तेथें निर्माण होऊं नये असें म्हणतांच मैत्रीचा आव आणून 'बदललेल्या परिस्थितींत वाटाघाटी करावयाची आमची तयारी आहे.' असें रशिया निश्चितपणें म्हणूं लागेल. 'जिनेव्हाची दृष्टि मध्यपूर्वेकडेहि कां स्वीकारूं नये' असें मॉस्को रेडिओ विचारूं लागला आहे.

" रशियाच्या लगतचे शेजारी संभाव्य आक्रमणाविरुद्ध संरक्षक संघटनेंत सामील झाल्याचें त्याला दिसत आहे. बऱ्याच काळानंतर काल (ऑक्टोबर ११) इराणनें तुर्कस्थान, इराक, पाकिस्तान यांच्या संरक्षक संघटनेंत, आपलें आतापर्यंतचें अळंटळं करण्याचें धोरण सोडून, सामील होण्याचा निर्णय घेतल्याची बातमी आली आहे.

"दुबळा आणि असुरक्षित प्रदेश शोधणारी रशियाची दृष्टि या राष्ट्रांच्या रेषेपलीकडे वळली असून, रशिया इजिप्त व अन्य अरब राष्ट्रांत आपलें वजन प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करूं लागला आहे. पाश्चात्त्य राष्ट्रांना या देशांच्या बाबतींत स्थिर स्वरूपांचें धोरण काळजीपूर्वक आंखणें भाग होतें. आणि यापासून पर्यायानें त्यांच्या व इतरांच्या हितसंबंधाला निर्माण होणाऱ्या धोक्याकडे दुर्लक्ष करीत आहे. "

## नवचीनच्या वेतनपद्धतींत बदल

सरकारी नोकरांना जीवनोपयोगी वस्तूंचा आवश्यक पुरवठा होऊं शकेल अशा वेतनपद्धतीऐवजीं पैशाच्या रूपानें वेतन देण्याची पद्धति नवचीननें १५ सप्टेंबर रोजीं स्वीकारली. या बदलासंबंधीं १५ सप्टेंबरच्या अंकांत पेकिंगचें **पीपल्स डेली** हें पत्र म्हणतें :

" या निर्णयामुळें जुलै १९५५ पासून सर्व सरकारी नोकरांना पैशाच्या रूपानें वेतन देण्यांत येईल. आणि यापुढें जीवनाच्या गरजा भागविण्यासाठीं आवश्यक खर्च त्यांना या वेतनांतूनच पुरा करावा लागेल. जुन्या 'पुरवठा-पद्धती' प्रमाणें सर्व आवश्यक खर्च सरकार देत असे.

" जुन्या 'पॅरिटी युनिट' ऐवजीं नव्या चलनाच्या रूपांतच हें वेतन दिलें जाईल. सर्व प्रकारच्या वस्तूंचे भाव स्थिरावले असल्याकारणानें द्रव्यात्मक वेतनपद्धति स्वीकारणें शक्य झालें आहे. या वेतनपद्धतींतील बदलामुळें एकसूत्रीपणा प्रस्थापित होऊन सरकारी नोकरांचें राहणीचें मान सुधारण्यास मदत होईल. नवचीनची स्थापना झाल्यापासूनच हा बदल हळुहळु घडवून आणला जात असून जुलैपूर्वी देखील अनेक सरकारी नोकरांना या पद्धतीनें द्रव्यरूपानें वेतन दिलें जात होतें.

" पुरवठा – पद्धतीची पूर्वीच्या काळांत आवश्यकता होती. क्रांतियुद्धांत तिच्या योगानें पुष्कळच महत्त्वाचें साहाय्य झालें. आतां विजय मिळून समाजवादी रचनेच्या उभारणीचें कार्य सुरूं झाल्यामुळें त्या पद्धतीचें कार्य संपलें आहे. 'काम तसा दाम' या समाजवादी तत्त्वाचा अवलंब करणें आतां आवश्यक झालें आहे. या नव्या पद्धतीमुळें कामगारांना राज्यासाठीं व स्वतःसाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा करण्याची संधी मिळणार आहे. "

—गोवर्धन पारीख








अनुक्रमणिका

Regd. No B. 5177



अनुक्रमणिका